•

मानवतेचे अमर मित्र

**इसाप**

व

**विष्णुशर्मा**

यांस

•

## दोन शब्द

खलिल जिब्रानच्या '*The ForeRunner* ( अग्रदूत ) या पुस्तकांतल्या रूपक-कथांचा हा संग्रह 'सुवर्णकणा' च्या दुसऱ्या आवृत्तीबरोबर मी वाचकांच्या पुढें ठेवीत आहें. 'सुवर्णकण' चार वर्षांपूर्वी प्रथम प्रसिद्ध झालें. त्या वेळीं वाचकवर्गानें त्याचें स्वागत फार चांगल्या रीतीनें केलें. अनुवाद करतांना अर्थपूर्ण पण थोडीफार गूढ रम्य अशी कथा केवळ न देतां प्रत्येक गोष्टीला स्पष्टीकरण जोडून ती अधिक सुगम केल्याबद्दल या चार वर्षांत अनेकांनीं माझ्याजवळ आपला संतोष व्यक्त केला. माझ्या विवेचनाचें इंग्रजी भाषांतर करून त्याच्यासह या कथा परत इंग्रजींत प्रसिद्ध कराव्यात असा वरचेवर आग्रह करणारे लोकही मला भेटले आहेत ! सामान्य

वाचकाला मूळ कथेचें मर्म अधिक स्पष्ट व्हावें, तिचा रसास्वाद अधिक सुलभतेनें घेतां यावा, बाह्यतः जी त्याला काळोखानें भरलेली गुहा भासत असेल तिथें उज्ज्वल प्रकाशानें नटलेलें सुंदर भूमिगत मंदिर आहे याची जाणीव त्याला व्हावी, या हेतूनेंच 'सुवर्णकणा' मध्यें कथेच्या खालीं तिचें विवेचन करण्याची प्रथा मीं सुरू केली. ही पद्धत पुष्कळांना उपकारक वाटते याचा या संग्रहांतल्या गोष्टी नियत-कालिकांतून प्रसिद्ध होत असतांना मीं पुन्हां एकदां अनुभव घेतला. पण 'सुवर्णकणा'च्या प्रस्तावनेंत माझी बाजू मीं मांडली असूनही अधूनमधून या पद्धतीवर टीका होतच असते. ती कितपत साधार आहे हें वाचकांनीं स्वतःच ठरवावें म्हणून हे दोन शब्द मी लिहीत आहें.

विवेचन नको म्हणणाऱ्या महापंडितांचे अनेक वर्ग पडूं शकतील. कुठें जिब्रान आणि कुठें खांडेकर, जिब्रानचा अर्थ सांगावा तर तो आमच्यासारख्यांनींच, असें वाटणारांचा पहिला वर्ग. या लोकांना सूचकतेनें नटलेल्या आणि क्वचित् गूढतेनें गुरफटलेल्या जिब्रानच्या कथा हा तळहाताचा मळ वाटत असावा! विवेचनामुळें सूचकतेची गोडी कमी होते असें म्हणणारांचा दुसरा वर्ग. त्यांच्या आक्षेपांत तथ्य आहे; नाहीं असें नाहीं. पण या आक्षेपकांना तरी या कथा खरोखरीच पूर्णपणें समजतात कीं नाहीं याविषयीं मधून मधून माझ्या मनांत शंका उत्पन्न होते. कारण त्यांच्यामध्यें खऱ्या पंडितांप्रमाणें अरण्यपंडितही असण्याचा संभव आहे. या टीकाकारांचे आणखीही कांहीं प्रकार सांगतां येतील. या सर्व विद्वानांची खानेसुमारी केली तर त्यांची संख्या फार थोडी भरेल, यांत मुळींच संशय नाहीं. विवेचनामुळें सूचकतेचा आनंद कमी होऊन या मूठभर लोकांचा विरस होत असला

तरी ज्यांना पूर्वी या कथांपासून फार थोडा आनंद मिळत असे, त्यांना तो वृद्धिंगत करण्याचें एक साधन अशा रसग्राहक टीकेनें उपलब्ध होतें हें कांहीं खोटें नाहीं. समाजांत असेच लोक फार असत नाहींत काय ? त्यांची रसिकता अविकसित असते. ग्रंथालयांत बसून, कोश चाळून, चर्चा करून, डोकें खाजवून किंवा अशाच एखाद्या अन्य मार्गाचा अवलंब करून वाङ्मयाशीं समरस होण्याइतकी सवड आणि जरूर त्यांना नसते. त्यांना सौंदर्य मोह घालूं शकतें. पण तें चटकन् दिसणारें हवें, झटकन् आकळतां येणारें हवें ! त्यांना कुठलाही प्रकारचा नारिकेल-पाक आवडत नाहीं.

जिब्रानमध्यें श्रेष्ठ प्रतिभावंताचे अनेक अमोल गुण असले तरी प्रसाद हा कांहीं खास त्याच्या लेखनाचा प्रमुख गुण नाहीं. ज्याच्या कल्पकतेची भरारी मोठी आहे, जगांतल्या सूक्ष्म विसंगती ज्याला तीव्रतेनें जाणवतात, शारीरिक जीवनाइतकेंच आत्मिक जीवन हें मानवाच्या विकासाला आवश्यक आहे हें ज्याला पदोपदीं पटतें, असा कलावंत कल्पनेच्या, रूपकांच्या आणि प्रतीकांच्या द्वारानें आपल्या अनुभूती सांगूं लागला तर त्या सर्वांना सहजासहजीं समजतील अशी अपेक्षा करणें हें थोडेंसें चुकीचेंच नाहीं काय ? जहाल औषधाच्या एकेका थेंबांत विलक्षण सामर्थ्य असतें. जिब्रानच्या कल्पनांत आणि त्याच्या आविष्कारांत तशीच प्रभावी शक्ति आहे. शेंकडों फुलें पिळून काढलेलें थेंबभर अत्तर त्याच्या इवल्याशा कथेच्या कुपींत असतें. हें अत्तर उडून जाऊं नये म्हणून कीं काय या कुपीचें तोंड तो कुशलतेनें बंद करतो. तें कसें उघडायचें हेंच अनेकांना कळत नाहीं. चुकून तें उघडलेंच तर या अत्तराचा सूक्ष्म सुगंध परिचित नसल्यामुळें या कुपींत कुणी पाणीच भरलें नाहीं ना असें वाटून त्यांना तें फेंकून

देण्याची इच्छाही उत्पन्न होण्याचा संभव आहे. या सर्व आपत्ती कथेचें विवेचन केल्यानें थोड्याफार टळतील अशी खात्री वाटूनच मीं चार वर्षांपूर्वी या पद्धतीचा आश्रय केला. यांत माझा पांडित्यप्रदर्शनाचा हेतु मुळींच नाहीं. मी कुणी मोठा कवि किंवा तत्त्वज्ञ नाहीं. सर्व प्रकारच्या घटपटादि खटपटींपासून मी जन्मभर अलिप्त राहिलों आहें. मी राखून ठेवलेल्या खुर्चीवरला किंवा खास निमंत्रणावरून हजर राहिलेला प्रेक्षक नाहीं. पिटमध्यें बसून नाटक पाहणाऱ्या हजारों लोकांपैकीं एक मनुष्य आहें मी ! जिब्रानच्या ज्या गोष्टी प्रथमदर्शनीं मला क्लिष्ट, गूढ, अथवा दुर्बोध वाटल्या त्या आपल्यासारख्या असंख्य वाचकांनाही तशाच वाटण्याचा संभव आहे, या कल्पनेनें मीं त्याच्या कथांचा अनुवाद सटीक करण्याचें ठरविलें. मी सामान्यांचा प्रतिनिधि आहें. सर्वसामान्य वाचकाला जिब्रान मुळींच न कळण्यापेक्षां विवेचनामुळें त्याला त्याच्यांत थोडी गोडी वाटूं लागली म्हणजे आपले श्रम सफल झाले अशी या बाबतींत माझी पहिल्यापासून भूमिका आहे.

अशा प्रकारच्या विवेचनावर आणखी एक आक्षेप अनेकदां घेण्यांत येतो. तो सत्यही आहे. विवेचन ही कांहीं झालें तरी रसग्राहक किंवा मार्गदर्शक अशी टीका असते. अर्थात् अशा टीकेंत टीकाकाराचा वैयक्तिक दृष्टिकोन व त्याच्या आवडीनिवडी प्रतिबिंबित होणें अपरिहार्य आहे. त्याच्या ज्ञानाच्या, कल्पकतेच्या व सहानुभूती-च्या मर्यादा अशा विवेचनाला पडणारच ! पण यांत भिण्यासारखें अगर बुजण्यासारखें काय आहे ? एखादा मल्लिनाथ शाकुंतलावर किंवा एखादा ब्रॅडले शेक्सपीअरवर जेव्हां टीका करतो तेव्हां एका श्रेष्ठ कलावंताचें अंतरंग विशद करण्याची त्याला प्रामाणिक इच्छा असते. पण त्याच्या विवेचनांत कळत न कळत त्याचें व्यक्तित्व

प्रतिबिंबित होतेंच होतें. कोणत्याही प्रकारच्या टीकाकारानें कितीही प्रयत्न केला तरी त्याचें मन पाण्यासारखें राहूं शकत नाहीं. त्याचा स्वतःचा म्हणून कांहीं रंग त्याला असतोच. त्यामुळें कुठल्याही लेखकाच्या कृतीवर तो प्रकाश टाकूं लागला कीं न कळत दोन रंगांचें मिश्रण होतें. दोन आत्म्यांचें संमेलन म्हणा हवें तर त्याला. या संमेलनामुळें मूळ लेखकाला वेळीं अन्याय घडण्याचा संभव आहे हें मला मान्य आहे. पण तो ज्याच्याकडून घडेल त्याची सारी धडपड त्या लेखकाला न्याय देण्याकरितां आणि त्याच्या लेखनांतल्या सुप्त सौंदर्याचा आविष्कार करण्याकरितां चाललेली असते हें आपण विसरतां कामा नये.

● ● ●

जिब्रान हा इसापचा विसाव्या शतकांतला खराखुरा वारस आहे. पण या शतकांत पूर्वीचें साधेंसुधें मानवी जीवन जसें गुंतागुंतीचें होऊन बसलें आहे, तशी जिब्रानची कथाही इसापच्या मानानें अधिक अंतर्मुख व म्हणूनच गूढरम्य झाली आहे. असें होण्याचें आणखीही एक कारण आहे. इसापच्या प्रतिभेचा प्रकृतिधर्म मुख्यतः जीवनवादी टीकाकाराचा आहे. जिब्रानमध्यें कवि, टीकाकार व तत्त्वज्ञ या तिघांचें मिश्रण झालें आहे. या त्रिवेणी-संगमामुळें त्याच्या गोष्टींची रम्यता वाढली आहे, हें कुणीही नाकबूल करणार नाहीं. पण त्या रम्यतेबरोबर गूढतेनेंही तिथें प्रवेश केला आहे. आपल्या पूर्व वयांत जिब्राननें ज्या प्रकारच्या गोष्टी लिहिल्या आहेत तशा तो शेवटपर्यंत लिहीत राहिला असता तर त्याच्या गोष्टींवर भाष्य करण्याची कल्पना स्वप्नांतसुद्धां मला सुचली नसती. उदाहरणार्थ त्याच्या पहिल्या गोष्टींपैकीं गंभीर सामाजिक आशय असलेली ही कथा पहा—

## गुन्हेगार

रस्त्याच्या कडेला एक तरुण मनुष्य जाणाऱ्या-येणाऱ्याच्यापुढें हात पसरून बसला होता. तशी त्याची अंगकाठी चांगली होती; पण भुकेनें त्याच्या शरीरावर विलक्षण अवकळा आणली होती. पोटांतल्या आगींत त्याचीं आंतडीं तडफडत होतीं. लाजेनें त्याचें अभिमानी मन खजिल झालें होतें. पण जाणाऱ्यायेणाऱ्याला आपल्या पराभूत जीवनाची करुण कथा सांगितल्या-वांचून आणि प्रत्येकाकडे भीक मागितल्यावांचून त्याला दुसरी गातिच नव्हती.

हळुहळु रात्र पडली. त्याचे ओठ आणि जीभ सुकून गेलीं. पण त्याच्या पोटाप्रमाणें त्याचा हातही रिकामाच राहिला.

मोठ्या कष्टानें तो आपल्या जागेवरून उठला. शहरा-बाहेर जाऊन एका झाडाखालीं त्यानें आपलें अंग टाकलें. कितीतरी वेळ तो मुसमुसून रडत होता. मग त्यानें आपले अश्रु पुसले आणि क्षणोक्षणीं आंतडीं कुरतडणाऱ्या पोटांतल्या भुकेकडे दुर्लक्ष करून आपली गोंधळलेली नजर वर आकाशाकडे लावली. तो म्हणाला, 'देवा, श्रीमंत माणसांकडे जाऊन मीं काम मागितलें. पण माझे फाटकेतुटके कपडे पाहून त्यांनीं मला हांकलून

लावलें. शाळेच्या दरवाजांत जाऊन मी उभा राहिलों. मी कफल्लक असल्यामुळें तिथें ज्ञानामृताचा थेंबसुद्धां मला चाखायला मिळाला नाहीं. ज्यांत प्रामाणिक-पणानें पोटापुरती मीठभाकर मिळेल अशा धंद्याचा मीं खूप शोध केला. त्याचा कांहीं कांहीं उपयोग झाला नाहीं. देवळाच्या दारांत उभा राहून मी भीक मागूं लागलों. पण तिथें तुझ्या पूजेकरितां येणारे भक्त मला पाहून म्हणूं लागले, 'हा चांगला धडधाकट पण आळशी मनुष्य दिसतोय् ! याला कोणी भीक घालूं नका.' देवा, तुझ्याच इच्छेनं मला या जगांत जन्म मिळाला. पण या जगांत मला रहायला जागा नाहीं; खायला अन्न नाहीं. माझें आयुष्य संपण्यापूर्वींच मला मेलं पाहिजे !'

त्याची मुद्रा एकदम बदलली. तो आपल्या जागेवरून झटकन् उठला. त्याच्या डोळ्यांत आतां निराळ्याच प्रकारचा निश्चय चमकत होता. तो ज्या झाडाखालीं बसला होता त्याच्या फांदीची त्यानें एक जाडजूड काठी तयार केली. ती हातांत घेऊन समोर पसरलेल्या शहरा-कडे पहात तो मोठ्यानें म्हणाला, 'मी डोळ्यांत प्राण आणून जगाला भाकरीचा तुकडा मागितला; पण मला तो कुणी दिला नाहीं. आतां मी तो माझ्या मनगटाच्या जोरावर मिळवणार आहें. दया आणि प्रेम यांच्या नांवानें मीं या दुनियेंत भीक मागितली; पण एकाही मनुष्यानें तीं मला घातली नाहीं. जें मला सरळ मार्गानें

*या जगांत मिळालें नाहीं तें आतां मी जबरदस्तीनें हिसकावून घेतल्याशिवाय रहाणार नाहीं.'*

*अनेक वर्षें लोटून गेलीं. एके काळीं उपाशी भिकारी असलेला तो तरुण आतां मोठा प्रसिद्ध दरवडेखोर झाला. माणसांना ठार मारणें हा त्याचा तळहाताचा मळ बनून गेला. आपल्याला विरोध करणाऱ्या प्रत्येकाला तो धुळीला मिळविल्यावांचून रहात नसे. कुणाला कल्पनाही करतां येणार नाहीं इतकी संपत्ति आतां त्याच्यापाशीं सांठली. पैशापुढें सत्ता देखील मान वांकविते. त्याच्या बाबतींतही तसेंच झालें. त्याचे साथीदार त्याला मोठा मान देत. दरवडेखोरांना त्याचा हेवा वाटे आणि सर्व-सामान्य लोक त्याचें नांव निघालें कीं भीतीनें थरथर कांपूं लागत. या सर्वांचा परिणाम त्या शहराच्या अमिरावर झाला. त्यानें त्याला आपल्या हाताखालचा अधिकारी नेमलें. साहाजिकच त्या शहरांत चोऱ्यांना कायदेशीर स्वरूप आलें. जुलुमाला सत्तेचा पाठिंबा मिळाला. दीनदुबळ्यांना चिरडून टाकणें ही नित्याची गोष्ट होऊन बसली. लोक या दरवडेखोराची स्तुति करूं लागले—थुंकी झेलूं लागले.*

*मनुष्यजातीच्या स्वार्थाच्या स्पर्शानें साधींसुधीं माणसें अशीं गुन्हेगार बनतात. शांततेचे उपासक हिंसक होतात ! मनुष्याचा लोभ हें एक विचित्र विषबीज आहे. तें एकदां पेरलें कीं हां हां म्हणतां मोठा वृक्ष होतो आणि*

*मग त्या वृक्षाचीं हजारों कडू फळें साऱ्या मानवतेला मुकाट्यानें चाखावीं लागतात.*

●●●

तसें पाहिलें तर इसापच्या गोष्टीपेक्षांही ही कथा साधी आहे. तिचा सारा मामला उघड उघड आहे. जीवनविषयक तत्त्व सूचित करण्याकरितां इसाप बहुधा पशुपक्ष्यांचा आश्रय करतो. तसें या कथेंत कांहीं एक नाहीं. एका दरिद्री मनुष्याची नागडीउघडी कहाणी आहे ती ! तो प्रथम जगापुढें हात पसरून भीक मागतो. जग त्याच्याकडे उद्धटपणानें पहात आणि बेपर्वाईनें हंसत आपल्याच गुर्मींत पुढें चालूं लागतें. पाषाणहृदयी जगाला आपल्यापुढें पसरलेल्या हातांतलें लाजिरवाणें दैन्य सहसा दिसत नाहीं; पण त्याच हातानें आपली मूठ वळली म्हणजे मात्र तिच्यांतली पाशवी शक्ति तत्काळ त्याच्या प्रत्ययाला येते. जगाचा हा न्याय लक्षांत येतांच तो भिकारी चोर बनतो. या नव्या कलेंत पारंगत होऊन लवकरच तो प्रसिद्ध दरवडेखोर होतो. आतां सारे लोक त्याला भिऊं लागतात. पूर्वी त्याच्याकडे ढुंकून न पाहाणारें जग त्याचे पाय चाटूं लागतें.

एवढें स्पष्ट वर्णन करूनच जिब्रान या गोष्टींत थांबत नाहीं. इसाप आपल्या कथेच्या शेवटीं जसें तात्पर्य देतो, त्याप्रमाणें गोष्ट संपतांच जिब्रानही तिच्यापासून काय बोध घ्यायचा हें वाचकांना बजावतो. तो म्हणतो, ' मनुष्यजातीच्या स्वार्थी स्वभावामुळें साधींसुधीं माणसें अशीं गुन्हेगार बनतात ! '

कुठलाही आडपडदा न ठेवतां निवेदन केलेल्या असल्या गोष्टीवर भाष्य करण्याची आवश्यकता कुणाला भासेल ? पण कलादृष्ट्या कौशल्यहीन अशा या पद्धतीच्या गोष्टी जिब्रानच्या पुढच्या लिखाणांत

आढळत नाहींत. त्याच्या कथांतली कला पुढें मोठी सुकुमार झाली आहे. तरल कल्पकता, मधुर तात्त्विकता, नाजुक उपरोध, सूक्ष्म जीवनदर्शन, इत्यादिकांमुळें तिला निराळीच अवीट गोडी प्राप्त झाली आहे. एखादें रंगी बेरंगी फुलपांखरूं भूर्‌कन् डोळ्यासमोरून उडून जावें आणि त्याच्या त्या क्षणिक दर्शनांतून विश्वांतल्या विविध रंगांचें सौंदर्य आपल्या अंतश्चक्षूंपुढें उभें राहावें, तसें कांहीं तरी त्याच्या परिणत प्रतिभेनें लिहिलेल्या कथा वाचून वाटतें. साहजिकच त्या कथांशीं सर्वसामान्य वाचकाला चटकन् समरस होतां येत नाहीं. त्यांतलें कल्पनेचें नावीन्य त्याला मोहिनी घालतें. पण कथेच्या आत्म्यांत तो सहजासहजीं प्रवेश करूं शकत नाहीं. उदाहरणार्थ जिब्रानची ही एक अगदीं छोटी गोष्ट पहा–

जुलूम

*समुद्रकांठच्या सात गुहांवर डोळ्यांत तेल घालून पहारा करणारी राक्षसी हें गाणें नेहमीं गात असते... लाटांवर स्वार होऊन माझा प्रियकर माझ्याकडे येईल. त्याच्या मेघगर्जनेसारख्या आवाजानें सारी पृथ्वी भयाभीत होऊन जाईल. त्याच्या नाकपुड्यांतल्या अग्निज्वालांनीं आकाशाला आग लागेल. चंद्रग्रहणा-दिवशीं आमचें लग्न होईल आणि सूर्यग्रहणादिवशीं माझ्या पोटीं सेंट जॉर्ज जन्माला येईल. तो मला ठार मारील.*

*समुद्रकांठच्या सात गुहांचें संरक्षण करीत उभी असलेली राक्षसी हें गीत नेहमीं गात असते.*

जिब्रानची कथा एवढीच आहे. तिचें नांव 'जुलूम' असें आहे. पण या नांवावरून कितीशा वाचकांना तिच्यांतलें मर्म कळूं शकेल? या कथेंत उल्लेखिलेल्या राक्षसीची किंवा सेंट जॉर्जची त्याला माहिती असण्याचा संभव फार कमी. ती त्यानें मोठ्या सायासानें मिळविली तरी तेवढ्यावरूनही हिचा रसास्वाद त्याला घेतां येईल असें मला वाटत नाहीं.

जिब्रानच्या या गोष्टीला आधारभूत असणारी मूळ कथा स्थूलमानानें अशी आहे—

सेंट जॉर्ज हा प्राचीन काळच्या इंग्लंडमधला एक तरुण वीरपुरुष होता. अंगावर चिलखत चढवून आणि हातांत आपली जादूची तलवार घेऊन साहसी कृत्यें करीत तो सर्वत्र फिरत असे. एके दिवशीं तो घोड्यावरून असाच फिरत फिरत मूर्तिपूजकांच्या प्रदेशांत गेला. तिथें त्याला एक सुंदर राजकन्या दिसली. तिच्या अंगावर वधूचा वेष होता. ती समुद्राच्या दिशेनें चालली होती. त्या ठिकाणीं एक भयंकर राक्षस अग्नि-ज्वाळा ओकीत असून साऱ्या लोकांना त्रस्त करून सोडीत आहे असें तिनें त्याला सांगितलें. त्या राक्षसाचें भयंकर वर्णन ऐकून सेंट जॉर्ज मुळींच डगमगला नाहीं. डरकाळ्या फोडीत आणि आपली विषारी शेपटी जोरजोरानें आपटीत तो राक्षस समुद्राच्या बाजूनें पुढें आला. सेंट जॉर्जनें आपल्या तलवारीच्या घावांनीं त्याला घायाळ केलें. नंतर राजकन्येला त्यानें नगरां-तल्या मुख्य चौकाचा रस्ता दाखवायला सांगितलें. तिथें त्या

राक्षसाला घेऊन तो तिच्या मागून गेला. राजाच्या व सर्व लोकांच्या समक्ष त्यानें त्याला यमसदनाला पाठविलें.

● ● ●

या पुराणकथेचा जिब्रानने 'जुलूम' या आपल्या रूपक-कथेंत उपयोग केला आहे. पण त्याला केवळ ही कथा जशीच्या तशी सांगायची नव्हती. त्याला जें सांगायचें आहे तें सर्वस्वीं निराळें आहे. त्याच्या कल्पनेच्या आत्म्याला एक शरीर हवें होतें. तें या कथेच्या सांगाड्यांतून त्यानें मिळविलें. त्यांत त्यानें जरूर ते बदलही केले. आपल्याकडे खाडिलकरांनीं पौराणिक कथांत असेच फेरफार करून आपली नाट्य-रचना केली आहे. यांत गैर असें कांहींच नाहीं. मात्र जिब्रानच्या आशयाची यथार्थ कल्पना आल्याशिवाय केवळ मूळ गोष्टीच्या ज्ञानानें या रूपक-कथेचें रसग्रहण कुणालाही करतां येणार नाहीं. वर दिलेल्या पुराणकथेंत एक दुष्ट राक्षस आहे व त्याला मारणारा सेंट जॉर्ज हा सत्पक्षाचा कैवारी असलेला शूर तरुण मनुष्य आहे. पण जिब्रानच्या कथेंत राक्षसाच्या जोडीला राक्षसी आली आहे. या विचित्र जोडप्याच्या प्रेमविवाहाला चंद्रग्रहणासारखा मुहूर्त हवा असें लेखक कटाक्षानें म्हणतो. मूळ कथेंत राक्षसाशीं सेंट जॉर्जचें कांहींच नातें नाहीं; पण या गोष्टींत तो या दांपत्याच्या पोटीं जन्माला येतो. सूर्यग्रहणाच्या मुहूर्तावर या बालकाचा जन्म होतो असें जिब्रान मुद्दाम सांगतो. या साऱ्या फेरफारांत आणि कथेच्या नव्या गुंफणींत जिब्रानला जें कांहीं सांगायचें आहे तें सूचित झालें आहे. पण त्याचें दर्शन ज्याला सहजासहजीं होऊं शकेल, त्यालाच या गोष्टींतला रस चाखतां येईल.

क्रांति केव्हां, कुठें व कशी जन्माला येते हें सांगण्याकरितां

जिब्राननें एक जुनी पौराणिक कथा घेऊन तिला इथें नवें रूप दिलें आहे. बहुजनसमाजाची गुलामी मनोवृत्ति ही क्रांतीची आई आहे. या गोष्टींतल्या राक्षसीच्या रूपानें जिब्राननें ती चित्रित केली आहे. ती समुद्रकांठच्या सात गुहांवर एकसारखा पहारा करीत असते. या सात गुहा म्हणजे माणसाचे सात आत्मे होत. ही सात आत्म्यांची कल्पना जिब्रानमध्यें वारंवार आढळते. गुलामगिरीची वृत्ति माणसाच्या आत्म्याचा विकास होऊं देत नाहीं हें सूचित करण्याकरितां त्यानें हें वर्णन केलें आहे. समुद्रावरून गर्जना करीत आणि अग्निज्वाळा ओकीत येणारा राक्षस म्हणजे जुलूम होय. सत्ता, स्वार्थ, संपत्ति, इत्यादिकांनीं धुंद झालेलीं माणसें जगावर नेहमीं क्रूरपणानें अधिराज्य चालवूं इच्छितात. त्यांच्या कोशांत दंड हा एकच शब्द असतो. दयेला त्यांत कधींच जागा मिळत नाहीं. दीनदुबळ्यांचें आणि दलित-गलितांचें रक्त ही त्यांच्या दृष्टीनें मोठी मधुर रुचि असलेली मदिरा असते. सत्ताधाऱ्यांचा जुलूम आणि जनतेची गुलामी मनोवृत्ति यांची युति म्हणजेच या रूपक-कथेंतलें राक्षस आणि राक्षसी यांचें लग्न होय! तें चंद्रग्रहणादिवशीं होतें हें सांगून ही अमंगळ युति जगांतल्या साऱ्या सौंदर्याचा नाश करणारी आहे हें जिब्रान सुचवितो. लोकांची गुलामी मनोवृत्ति आणि सत्ताधाऱ्यांचा जुलूम यांचा असा भयानक जोडा जमला कीं जीवनांत जिकडेतिकडे अंधार पसरतो. सज्जनांचा अनन्वित छळ होऊं लागतो. सामान्यांना सुखानें जगणें अशक्य होऊन जातें. शेवटीं या असह्यतेंतूनच बंडखोर वीर निर्माण होतात. असलें हीन दीन लाजिरवाणें जिणें जगण्यापेक्षां स्वातंत्र्याकरितां मरून जाणें बरें असें त्यांना वाटूं लागतें. जनतेच्या सुप्त शक्ती जागृत होतात. त्या उफाळून वर येतात. गुलामी मनोवृत्तीच्या पोटींच तिला मारून टाकणारी क्रांति जन्माला येते.

●●●

२

या छोट्या कथेचा मीं वर दिलेला अर्थ जिब्रानच्या मूळच्या सर्व

कल्पनांशीं पूर्णपणें सुसंगत असेल असें म्हणण्याचें धाडस मी करीत नाहीं. कलाकृति निर्माण करतांना निर्मात्याच्या मनांत जीं रूपकें किंवा प्रतीकें तरळत असतात, ज्या वातावरणाचे धुंद तरंग त्याच्या डोळ्यांपुढें हेलावत असतात, शब्दाशब्दांतून अर्थपूर्णतेच्या ज्या सुंदर छटा त्याला जाणवत असतात, त्या सर्वांचें जसेंच्या तसें दर्शन वाचकाला होणें थोडेंसें कठिणच आहे. रसिकतेलाही रसिकाच्या बुद्धीची, ज्ञानाची, कल्पकतेची, भावनेच्या विकासाची, स्थलकालांची आणि असल्या असंख्य गोष्टींची मर्यादा आहेच कीं ! त्यामुळें कुठल्याही कलाकृतीच्या सौंदर्याचें स्पष्टीकरण करणाऱ्या दोन प्रामाणिक रसिकांचासुद्धां थोडाफार मतभेद होणें अपरिहार्य आहे.

फार पूर्वीं ‘ प ’ या टोपण नांवानें माधवराव पटवर्धनांनीं ‘ प्रगति ’ साप्ताहिकांत कांहीं आधुनिक कवितांचीं रसग्रहणें लिहिलीं होतीं. तीं वाचतांना हा अनुभव मला तीव्रतेनें येई. विवेचनाकरितां त्यांनीं निवडलेल्या कविता मीं पूर्वींच अनेकदां वाचल्या असल्यामुळें माझ्या मनांत स्थिर झालेलीं त्यांचीं चित्रें, त्यांच्या वाचनानें माझ्या हृदयांत उद्भवणारे भावनातरंग, इत्यादि गोष्टी जशाच्या तशा माधवरावांच्या रसग्रहणांत मला कधींच आढळत नसत. कांहीं कांहीं ठिकाणीं तर त्यांचा माझा मोठा मतभेद होत आहे असें मला वाटे. असें असूनही त्यांचे ते लेख मी मोठ्या आवडीनें वाचीत असें. पूर्वीं अनेकवार वाचलेल्या कवितांतलें कांहीं नवें सौंदर्य ते वाचकाच्या प्रत्ययाला आणून देत. त्यामुळें त्याच्या रसिकतेला उजाळा मिळे. ललित वाङ्मयाच्या प्रत्येक क्षेत्रांत असें विवेचन झालें तर सर्वसामान्य वाचकाची रसिकता नुसती वृद्धिंगतच होणार नाहीं, तर ती डोळसही होईल, असें तेव्हांपासून मला वाटत आलें आहे. आजही माझें तेंच मत कायम आहे.

जिब्रानच्या कथांचीं मीं केलेलीं विवेचनें प्रसंगीं सदोष असतील, अनेकदां तीं शालजोडीला लावलेल्या ठिगळासारखीं भासतील; पण तो दोष माझ्या अज्ञानाचा आणि अरसिकतेचा आहे. सर्वसामान्य वाचकाला विवेचन अधिक रसज्ञ करतें या माझ्या विधानाला त्यामुळें बाध यायचें कांहीं कारण नाहीं.

●●●

३

ज्यांत विचारांची, अनुभूतीची आणि जीवनदर्शनाची गुंतागुंत नाहीं अशीं जिब्रानचीं दोन प्रकरणें मी खालीं देत आहें. पहिल्याला मीं छोटेंसें विवेचन जोडलें आहे. दुसरें तसेंच आहे. तीं वाचूनही विवेचनाच्या बाबतींत वाचकांना आपलें मत ठरवितां येईल.

पक्षी

*माझ्या अंतरात्म्यांतून एक पक्षी बाहेर पडला आणि उडत उडत आकाशांत जाऊं लागला.*

*तो जसजसा अधिक उंच गेला तसतशी त्याची आकृति मला अधिक मोठी दिसूं लागली.*

*प्रथमतः तो एकाद्या पाकोळी एवढा दिसत होता. मग तो चंडोलासारखा भासूं लागला. नंतर त्याचा आकार गरुडाएवढा झाला. लगेच तो वसंतऋतूंतल्या मेघखंडासारखा दिसूं लागला. थोडयाच वेळांत त्यानें तारामंडळानें नटलेलें सर्व आकाश व्यापून टाकलें.*

माझ्या हृदयांतून एक पक्षी उडत उडत आकाशात गेला. उडतां उडतां त्याचा आकार मोठा झाला. पण माझ्यापासून दूर दूर जात असूनही तो माझ्या अंतःकरणांत होताच !

माझ्या हृदयांतल्या हे श्रद्धे, तूं अंतराळांत उंच उंच जातेस आणि आकाशाच्या विशाल पटावर रेखलेलें मानवाच्या महान् आत्म्याचें चित्र पाहतेस. इतकें उंच जाण्याची आणि तें अलौकिक चित्र पाहण्याची शक्ति मी कुठून आणूं ? हे श्रद्धे, माझ्या अंतरंगांतल्या सागराचें धुक्यांत रूपांतर करून अनंत अवकाशांत तुझ्याबरोबर विहार करण्याचें सामर्थ्य मला कुठें मिळेल ?

देवळांत बंदिवान होऊन पडलेल्या कैद्याला त्याचे सोनेरी कळस दिसूं शकतील का ?

फळांतली बी त्याची साल होण्याइतकी मोठी कशी होऊं शकेल ?

हे माझ्या हृदयांतल्या मंगल देवते, या काळ्या पांढऱ्या गजांच्या आड मी शृंखलाबद्ध होऊन पडलों आहें. मी तुझ्याबरोबर कसा येऊं ? उंच उंच भराऱ्या कशा मारूं ?

पण एक गोष्ट मात्र सत्य आहे. तूं आकाशांत कितीहि वर वर आणि माझ्यापासून कितीहि दूर दूर गेलीस तरी माझ्या हृदयांतून तूं बाहेर पडतेस. माझें अंतःकरण हेंच तुझें निवासस्थान आहे. आणि हेंही कांहीं लहानसहान भाग्य नाहीं. तेवढ्यावरही मी संतुष्ट राहीन !



[ श्रद्धा ही जीवनांतली फार मोठी शक्ति आहे. कारण श्रद्धा हें प्रीतीचेंच विशाल रूप आहे. प्रीति ही चिमणीसारखी असते. आपलें छोटें घरटें

निर्मल, उबदार व नीटनेटकें ठेवण्यांत आणि आपल्या पिलांना सांभाळण्यांत ती गुंग होऊन जाते. उलट श्रद्धा ही चंडोल पक्ष्यासारखी आहे. चंडोलाचें घरटें पृथ्वीवर असलें तरी प्रातःकाल होतांच गात गात प्रकाशाचें स्वागत करीत तो उंच उंच जात असतो. श्रद्धेची ही विशालता जेव्हां पराकोटीला पोंचते तेव्हां या चंडोलाचें गरुडांत रूपांतर होतें. मग स्वर्गांतिलें अमृत पृथ्वीवर आणण्याच्या ईर्ष्येनें ती श्रद्धा संचार करूं लागते. तिच्या पंखांत अद्भुत शक्ति निर्माण होते. सामान्य मनुष्याला या विशाल आणि अलौकिक श्रद्धेचें दर्शन होत नसलें तरी तिचें अस्तित्व त्यालाही जाणवत असतें. स्वार्थांत गुरफटलेल्या, शारीरिक सुखाला लालचावलेल्या आणि नेहमींच सपाट भूमीवरून सरपटणाऱ्या त्याच्या मनालाही मधून मधून दिव्य भास होत असतात. तो अंधार कोठडींत कोंडलेला कैदी असला तरी त्या कोठडीच्या झरोक्यांतुन आंत येणाऱ्या प्रकाशाची मनोमन पूजा केल्याशिवाय त्याला चैनच पडत नाहीं. या पूजेनेंच त्याला नवें सामर्थ्य प्राप्त होतें.

मात्र श्रद्धेचें अंधश्रद्धेंत अतिशय लवकर रूपांतर होण्याचा संभव असतो. आणि अंधश्रद्धेनें जगांत आजपर्यंत अनेक अनर्थ केले आहेत हें कांहीं खोटें नाहीं. पण अश्रद्धा अंधश्रद्धेइतकीच भयावह असते. म्हणून सॅम्युएल बटलरसारख्या मूर्तिभंजक ग्रंथकारानें सुद्धां श्रद्धेविषयीं खालील उद्गार काढले आहेत. 'श्रद्धेच्या बळावर मनुष्य विशेष कार्य करूं शकेल असें नाहीं. पण श्रद्धेवांचन त्याला कांहींच करतां येणार नाहीं.' बटलरची ही उक्ति लक्षांत घेतली म्हणजे आजच्या मानवतेपुढला खरा प्रश्न श्रद्धेचें निर्मूलन हा नसून तिचें विकसन आणि संस्करण हाच आहे हें कुणीही कबूल करील ]

या एकांतापलीकडे

*माझ्या या एकटेपणापेक्षां उच्चतर असें एकांतजीवन आहे. तिथें विहार करणाऱ्या आत्म्याला माझा हा एकांतवास माणसांनीं गजबजलेल्या बाजारासारखा वाटत*

असेल. माझें मौन हें त्याला निरनिराळ्या आवाजांच्या मिश्रणामुळें उत्पन्न होणाऱ्या कोलाहलासारखें भासत असेल.

त्या उच्च जीवनांत प्रवेश करायला मी अपात्र आहें. माझें मन चंचल आहे. तें अजून अपरिपक्व आहे. या खालच्या दरींतले विविध मधुर स्वर अजून माझ्या कानांत रेंगाळत आहेत. तिथल्या सावल्या अद्यापि माझी वाट अडवीत आहेत. अशा स्थितींत माझें पाऊल पुढें कसें पडणार ?

या टेकड्यापलीकडे एक मन मोहून टाकणारी राई आहे. तिथें निवास करणाऱ्या आत्म्याला माझी शांति वावटळीसारखी वाटत असेल. माझा आनंद हा त्याच्या दृष्टीनें निव्वळ आभास असेल.

त्या पवित्र राईंत पाऊल टाकायला मी अपात्र आहें. माझें मन अजून उच्छृंखल आहे. तें अजून अविकसित आहे. अद्यापि रक्ताची रुचि माझ्या जिभेवर रेंगाळत आहे. माझ्या वाडवडिलांचे धनुष्यबाण अजूनही माझ्या हातांत कायम आहेत. अशा स्थितींत मला पुढें कसें जातां येईल ?

अनेक ओझ्यांनीं भारावलेल्या या आत्म्यापलीकडे माझा मुक्त आत्मा आहे. माझीं सारीं स्वप्नें त्याला संधिप्रकाशांत चाललेल्या लढाईसारखीं वाटत असतील. माझ्या साऱ्या इच्छांत आणि आकांक्षांत त्याला नुसत्या हाडांची धडपड आणि खडखड ऐकूं येत असेल. माझें

*मन अजून अवखळ आहे. तें बंदिवान आहे. त्या मुक्त आत्म्याच्या प्रदेशांत जायला तें असमर्थ आहे.*

*ओझ्यांनीं भारावलेले माझे हे आत्मे मी स्वतः मारून टाकल्याशिवाय माझ्या मुक्त आत्म्याचें दर्शन मला कसें होईल ?*

*माझीं मुळें अंधारांत सुकत राहिल्याशिवाय माझीं पानें वायुलहरीवर गात गात कशीं उडूं शकतील ?*

*माझ्यांतला गरुड सूर्याच्या रोखानें आकाशांत उंच उडूं शकत नाहीं. स्वतःच्या चोंचीनें आपल्या पिलांकरितां त्यानें एक घरटें बांधलें आहे. तें सोडून तीं पिलें निघून जातील तेव्हांच त्याच्या अंगीं हें नवें चैतन्य निर्माण होईल.*

● ● ●

# ४

जिब्रानच्या कथांप्रमाणें त्याच्या काव्यांतही अलंकारप्रचुर भाषा, गूढ अनुभूतीचा आविष्कार, इत्यादि त्याचे विशेष आढळतात. पण विवेचनावांचूनही त्यांचें मर्म वाचकाला चांगलें कळू शकेल असें मला वाटतें. याचें कारण एकच आहे. काव्यांत कुठलीही एक भावना उत्कटतेनें आळवलेली असते. उलट कथेंत जीवनाच्या विविधतेंतून निर्माण झालेल्या चिंतनाचा व त्याच्या निष्कर्षाचा काव्यमय आविष्कार असतो. 'प्रीति' व 'मृत्यु' या विषयांवरच्या जिब्रानच्या दोन कवितांचा गद्य अनुवाद मी खालीं देत आहें. त्याच्या कथा किंवा गद्यकाव्यें यांपेक्षां त्यांत कमी गूढता आहे असा वाचकांनाही अनुभव येईल असें मला वाटतें.

## प्रीति

ज्या झऱ्यावर सिंह पाणी प्यायला येतो तिथेंच कोल्हा आणि चिचुंद्री हींही पाणी पितात असें लोक म्हणतात.

गरुड आणि गिधाड हे दोघेही एकाच प्रेतामध्यें आपल्या चोंची खुपसतात आणि त्या प्रेतासमोर गुण्यागोविंदानें एकमेकाशीं वागतात असेंही ते म्हणतात.

हे प्रीतिदेवते ! माझ्या सर्व इच्छांचा लगाम तुझ्या हातांत आहे. तुझ्या प्रभावानें माझी भूक आणि तहान यांचें स्वरूप संपूर्णपणं पालटलें आहे. त्यांना आपल्या श्रेष्ठत्वाची जाणीव झाली आहे. माझ्या दुबळ्या आत्म्याला मोह घालणारी भाकरी खाण्याची किंवा दारू पिण्याची चूक माझ्यांतल्या स्थिर आणि समर्थ आत्म्याच्या हातून कधींही न होवो. तूं आपल्या हातानें जो पेला भरलेला नाहींस तो स्वीकारण्यापूर्वीं किंवा ज्याला तुझा आशीर्वाद मिळालेला नाहीं अशा अन्नाच्या घांसाला स्पर्श करण्याकरितां मी माझा हात पुढें करण्यापूर्वीं मलामृत्यु येऊं दे! तहानेनें माझें अंतःकरण सकून जाऊं दे; पण माझा अधःपात होऊं देऊं नको !

## गिधाड आणि आसन्नमरण मनुष्य

माझ्या उतावळ्या मित्रा, थांब, अजून थोडा वेळ थांब ! आतां फार वेळ मी तुला तिष्ठत ठेवणार नाहीं. झिजून झिजून क्षीण झालेलं माझें हें शरीर मी लवकरच तुझ्या हवालीं करीन. या देहाच्या दीर्घ काळ चाललेल्या निष्फळ

वेदना तुझ्या सहनशीलतेचा अंत पाहत आहेत हें मला कळत नाहीं असें नाहीं. तुझी भूक खरी आहे, ती तीव्र आहे, याची मला जाणीव आहे. इतका वेळ तुला वाट पहायला लावण्याची माझी इच्छा नव्हती. पण काय करूं ? ही शृंखला—एका श्वासाची ही शृंखला— ती तुटायला मोठी कठिण आहे रे ! पुष्पाहूनही दुर्बळ असलेली जगण्याची इच्छा पर्वताहूनही दृढतर असलेल्या मरणाच्या इच्छेला अजून अडवीत आहे.

माझ्या मित्रा, मला क्षमा कर. माझ्याकडून फार विलंब होत आहे हें मला मान्य आहे. माझा जीव कशांत गुंतून राहिला आहे सांगूं ? हे पहा स्मृतींचे पाश त्याला मागें ओढीत आहेत. कालसागरांत कधींच बुडून नाहींशा झालेल्या त्या दूरदूरच्या दिवसांची ही सुंदर मालिका माझ्या डोळ्यांपुढून जात आहे. स्वप्नतरंगांवर गुंगत घालविलेल्या यौवनाचें हें दृश्य माझ्या दृष्टीपुढें तरळत आहे. मिटूं नका म्हणून माझ्या पापण्यांचीं आर्जवें करणारा एक चेहरा, माझ्या कानांत रुणझुणत राहणारा एक आवाज, आपल्या स्पर्शानें शरीराला गोड शिरशिरी आणणारा एक हात, हें सारें सारें मला दिसत आहे.

मित्रा, फार वेळ तुला मी तिष्ठत ठेवलें. क्षमा कर मला ! संपलें. हें सर्व संपलें...सारें अंधुक झालें...तो चेहरा... तो आवाज....तो हात...आणि त्या सर्वांना तरंगत घेऊन येणारें तें धुकें सारें सारें विरून गेलें.

गांठ सुटली...दोरी तुटली...ज्याचा अन्नपाण्याशीं

कांहींही संबंध नाहीं असा शरीरांतला अपार्थिव भाग आतां त्याचा निरोप घेऊन चालला आहे.

माझ्या भुकेल्या मित्रा, ये, जवळ ये! जेवणाची सर्व तयारी झाली आहे. बेत कांहीं मोठा थाटामाटाचा नाहीं. तो अगदीं साधासुधा आहे. पण मोठ्या प्रेमानें मी हें अन्न तुझ्यापुढें ठेवलें आहे. ये, प्रिय मित्रा, जवळ ये-माझ्या डाव्या बाजूंत अशी चोंच खुपस. तिथल्या चिमण्या पांखराला आपल्या पिंजऱ्यांतून ओढून बाहेर काढ. आतां त्याचे पंख कधींच फडफड करणार नाहींत. तुझ्याबरोबर त्यानें आकाशांत उंच उंच उडावें अशी माझी इच्छा आहे. ये, माझ्या मित्रा ये! आज रात्रीं मी तुझा यजमान आहें. तूं माझा पाहुणा आहेस. मी मोठ्या आनंदानें तुझें स्वागत करतों.

● ● ●

'*The Fore Runner*' या पुस्तकांतल्या जिब्रानच्या अठरा कथा या संग्रहांत मीं दिल्या आहेत. या कथांशिवाय त्याचीं जीं कांहीं इतर प्रकरणें आहेत तीं ओघाओघानें वर आलींच आहेत. पांच वर्षांपूर्वीपेक्षां अधिक आस्थेनें जिब्रान आतां आपल्याकडे वाचला जाऊं लागला आहे. निरनिराळे लेखक त्याच्या विविध लेखनाचे अनुवाद करीत आहेत. जिब्रानविषयींच्या भक्तीची ही उचंबळलेली लाट पाहून तिकडे कांहीं समाजहितचिंतकांना तिच्यांत जीवनविन्मुख आध्यात्मिकतेचा भास होत आहे, तर इकडे त्याचे कांहीं भक्त महाकवि, तत्त्ववेत्ता, मानवजातीला शांतीचा खराखुरा मार्ग दाखविणारा द्रष्टा, इत्यादि विशेषणांनीं त्याला भूषवीत आहेत.

जिब्रानच्या व्यक्तित्वाचें आणि वाङ्मयाचें मूल्यमापन करण्या-

इतका या दोन्ही गोष्टींचा मराठी वाचकांना अजून परिचय झालेला नाहीं. अशा स्थितींत त्याच्याविषयीं वाद माजविणारांना वाङ्मयाच्या प्रेमापेक्षां वितंडवादाचीच हौस अधिक आहे असें म्हणावें लागेल. मी त्याचा चाहता झालों तो कांहीं मला मोठी आध्यात्मिक तहान लागली होती आणि ती लेबेनॉनच्या पर्वतांतून उगम पावणाऱ्या आणि तुषारांच्या मौक्तिकमाळांनीं अलंकृत झालेल्या या झऱ्यावर ती मला शांत करायला मिळाली म्हणून नव्हे! कथाकार जिब्रानचा मी चाहता आहें. त्याच्या छोट्या छोट्या गोष्टी वाचतांना जीवनांतल्या सर्व विसंगती पूर्णपणें ठाऊक असूनही त्याच्यावर उत्कट प्रेम करणाऱ्या, आपल्या कल्पकतापूर्ण उपरोधानें ढोंग, जुलूम, असत्य, अन्याय, यांचें हिडिस स्वरूप स्पष्ट करून दाखविणाऱ्या आणि जगांतलें मांगल्य वृद्धिंगत व्हावें म्हणून मनापासून तळमळणाऱ्या एका थोर आत्म्याचें मला दर्शन झालें. अशा प्रकारच्या आत्म्याच्या सहवासांत आपण न कळत अंतर्मुख होतों. स्वतःकडे परक्याच्या दृष्टीनें पाहूं लागतों. आपल्या डोळ्यांवरली स्वार्थ, दंभ, क्षणिक उपभोग, इत्यादिकांची झांपड गळून पडते. स्थलकालांच्या आणि शरीराच्या मर्यादा ओलांडून आपण जीवनाकडे पाहूं शकतों. या आत्म्याच्या सान्निध्यांत घटकाभर का होईना आपण अधिक उन्नत, अधिक मंगल, आणि अधिक विशाल अशा एका जगांत वावरूं लागतों. वाचकाच्या मनावर असे संस्कार करणें हें सत्-साहित्याचें एक प्रमुख लक्षण आहे. जिब्रानच्या या छोटया कथांत साहित्याचा हा अतिशय मोठा गुण फार सुंदर रीतीनें प्रगट झाला आहे. माझ्याप्रमाणें या कथांच्या वाचकानांही हा अनुभव येईल असा मला विश्वास वाटतो.

शाहुपुरी, कोल्हापूर
१८-१०-४८

वि. स. खांडेकर



**पुढील प्रकाशनें**

*खलील जिब्रानचीं तीन पुस्तकें*

१ वाळूंतील फुलें

वि. स. खांडेकर

२ अतिथि

आचार्य काका कालेलकर

३ बंडखोर आत्मे

वि. स. खांडेकर



# स्वप्नाळु

१

वाळवंटांत राहणारा एक स्वप्नाळु मनुष्य एके दिवशीं विशाल अशा शरिया नगरींत आला. अंगावरलें वस्त्र आणि हातांतली काठी यांच्याशिवाय त्याच्यापाशीं दुसरी कुठलीही वस्तु नव्हती.

अपूर्व सौंदर्यानें नटलेल्या त्या नगरींतल्या मार्गांवरून जात असतांना त्याचें मन भीतियुक्त आदरानें भरून गेलें. त्याची दृष्टि पदोपदीं आश्चर्यानें फुलूं लागली. तीं देवालयें, ते बुरुज, ते राजवाडे—

मधून मधून रस्त्यानें जाणाऱ्या येणाऱ्या माणसाशीं त्यानें

बोलण्याचा प्रयत्न केला. त्या अलौकिक सुंदर शहराविषयीं तो त्यांना माहिती विचारूं लागला. पण त्यांना त्याची भाषा कळेना! त्याला त्यांच्या बोलण्याचा अर्थबोध होईना!

दुपार झाली. एका भव्य इमारतीपुढें तो थांबला. ष्विळ-सर संगमरवरी पाषाणांचें मंदिर होतें तें! त्या मंदिरांत माणसांची एकसारखी येजा सुरू होती. तिथें प्रवेश कर-ण्याला कुणालाही प्रतिबंध नव्हता.

त्या मंदिराकडे पाहत तो स्वप्नाळु मनुष्य स्वतःशींच उद्गारला, 'खास देऊळच असलं पाहिजे हें!' तोही त्या मंदिरांत शिरला.

आंत पाऊल टाकतांच तिथलें दृश्य पाहून तो चकित होऊन गेला. अतिशय सुंदर आणि सुशोभित अशा दिवाण-खान्यांत अनेक मेजें मांडलीं होतीं. त्याभोंवतीं असंख्य स्त्री-पुरुष बसले होते. ती सारी मंडळी खाण्यापिण्यांत गर्क होऊन गेली होती. विविध वाद्यें वाजवून वादक त्या स्त्री-पुरुषांचें मनोरंजन करीत होते.

तो पुटपुटला, 'छे! ही प्रार्थनेची किंवा उपासनेची जागा दिसत नाहीं. कसल्या तरी मंगल प्रसंगाच्या निमित्तानें इथल्या राजपुत्रानें बड्या बड्या लोकांना दिलेली मेजवानी दिसते ही!'

इतक्यांत एक मनुष्य त्याच्याजवळ मोठ्या अदबीनें आला. तो राजपुत्राचा नोकर असावा असें त्याला वाटलें. त्याला त्या

नोकरानें भोजनाला बसण्याची विनंती केली. लगेच त्याच्यापुढें मद्य, मांस आणि मोठी उत्कृष्ट मेवामिठाई ठेवण्यांत आली.

सर्व पदार्थ पोटभर खाल्ल्यावर तो स्वप्नाळु मनुष्य बाहेर जाण्याकरितां उठला. पण दरवाजापाशीं झकपक पोशाख केलेल्या एका भल्या मोठ्या माणसानें त्याला अडविलें!

तो मनांत म्हणाला, 'हा राजपुत्र असावा!' समारंभाचा यजमान म्हणून त्यानें त्याला नमस्कार केला आणि आपल्या भाषेंत त्याचे आभार मानले.

तो धष्टपुष्ट मनुष्य स्वतःच्या भाषेंत म्हणाला, 'तुम्ही आपल्या जेवणाचे पैसे दिले नाहींत. ते चुकते केल्याशिवाय तुम्हांला येथून जातां येणार नाहीं.' तो काय म्हणत आहे, हें त्याला कांहीं केल्या समजेना. तो आपल्या भाषेंत पुनः पुन्हां त्याचे आभार मानूं लागला. आतां कुठें दारावरल्या त्या लठ्ठ मनुष्याच्या मनांत एक शंका आली. त्यानें त्या स्वप्नाळु माणसाकडे निरखून पाहिलें. अंगावर फक्त एक भिकार चिरगुट असलेला हा कुणीतरी परका मनुष्य आहे आणि जेवणाचे पैसे द्यायला याच्याजवळ फुटकी कवडीसुद्धां नाहीं, हें त्याच्या लक्षांत येऊन चुकलें. लगेच त्यानें टाळी वाजवून कुणाला तरी हांका मारल्या. नगरांतले चार रक्षक एकदम धांवून आले. त्या धिप्पाड मनुष्याचें म्हणणें त्यांनीं ऐकून घेतलें आणि एका बाजूला दोन व दुसऱ्या बाजूला दोन असे ते त्याला घेऊन

चालूं लागले. त्यांच्या अंगावर दरबारी पोषाख आहे हें त्या स्वप्नाळु मनुष्याच्या ध्यानांत आलें. त्यांची शिस्तही त्याला आवडली. तो त्यांच्याकडे पाहून मोठ्या आनंदानें मनांत म्हणाला, 'या शहरांतलीं मोठीं प्रतिष्ठित माणसं दिसतात हीं!'

ते सर्वजण मिळून न्यायमंदिरांत आले. त्या परक्या मनुष्यानें समोर पाहिलें. एका सिंहासनावर एक भव्य पुरुष बसला होता. त्याची ती छातीवर रुळणारी दाढी आणि त्यानें परिधान केलेला तो रुबाबदार झगा पाहून हा राजाच असला पाहिजे अशी त्याची खात्री झाली. राजदर्शनाकरितां आपल्याला इथें आणलें आहे असें वाटून तो हर्षभरित होऊन गेला.

रक्षकांनीं न्यायाधीशाला या नवख्या मनुष्याचा गुन्हा सांगितला. न्यायाधीशानें फिर्यादीतर्फे एक व आरोपीच्या बाजूनें एक, असे दोन वकील नेमले. ते दोघे एकामागून एक आपल्या जागेवरून उठले आणि त्यांनीं आपापले मुद्दे मांडण्याकरितां लांबलचक वक्तव्यें केलीं. आपल्या स्वागताकरितां चाललेलीं हीं स्तुतिपर भाषणें आहेत असें वाटून, राजा आणि राजपुत्र यांनीं केलेल्या या सर्व सत्काराबद्दल त्या स्वप्नाळु मनुष्याचें अंतःकरण कृतज्ञतेनें भरून आलें.

त्याला शिक्षा झाली. त्याच्या गळ्यांत त्याचा गुन्हा लिहिलेली एक पाटी अडकवून शहरांतून उघड्या घोड्यावरून त्याची धिंड काढण्यांत यावी, अशी न्यायाधीशानें आज्ञा केली. लगेच तिची अंमलबजावणी झाली.

पुढें एक तुतारीवाला व एक ढोलकेवाला आणि मागें उघडच्या घोड्यावर तो स्वप्नाळु मनुष्य अशी मिरवणूक सुरू झाली. तुतारी आणि ढोल यांचे आवाज ऐकतांच शहरांतले सारे नागरिक काय चाललें आहे हें पाहण्याकरितां धांवून आले. हा देखावा पहातांच ते सारे पोट धरधरून हंसूं लागले. पोरांचीं टोळकीं रस्त्यांतून त्याच्या घोड्यामागून धांवूं लागलीं. त्याचें मन आनंदानें भरून गेलें. त्याचे डोळे समाधानानें चमकूं लागले. आपल्या गळ्यांतली पाटी ही राजानें आपल्याला दिलेली पदवी आहे आणि या पदवीदानाच्या प्रदर्शनाकरितां गांवांतून आपली मिरवणूक चालली आहे, असें त्याला एकसारखें वाटत होतें.

तो घोड्यावरून जात असतांना भोंवतालच्या गर्दीत त्याला एक ओळखीचा चेहरा दिसला. तो वाळवंटांत राहणारा दुसरा एक मनुष्य होता. त्याला पाहून त्या स्वप्नाळु माणसाचा आनंद गगनांत मावेना. तो मोठ्यानें ओरडून म्हणाला, ‘ मित्रा, आपण कुठं आहोंत ? मनुष्य फक्त स्वप्नांतच जिच्यांत विहार करूं शकेल, अशा या सुंदर नगरीचं नांव काय ? इथलीं माणसं किती उदार आहेत ! नाहीं ? अनोळखी पाहुण्याला देखील तीं मोठ्या प्रेमानं राजवाड्यांत आपल्या पंक्तीला बसवितात. इथले राजपुत्र सोबतीसाठीं त्याच्याबरोबर गांवांत सर्वत्र फिरतात. इथला राजा आपल्या प्रेमाची खूण म्हणून त्याच्या गळ्यांत एक सुंदर पदवी

बांधतो आणि स्वर्गालाही लाजवील अशा समारंभानें नगरांतून त्याची मिरवणूक काढतो !'

वाळवंटांतून आलेल्या त्या दुसऱ्या मनुष्यानें हें सारें ऐकलें. पण तो चकार शब्दसुद्धां बोलला नाहीं. त्यानें फक्त क्षणभर स्मित केलें आणि नकारार्थीं आपली मान हलविली.

इतक्यांत मिरवणूक पुढें चालूं लागली. त्या स्वप्नाळु माणसाच्या मुद्रेवर उल्हास नुसता ओसंडत होता. त्याच्या डोळयांत विलक्षण तेज चमकत होतें !



निसर्गानें मानवी जीवनाला दिलेल्या शापांचा अनुक्रम लावायचा झाला, तर त्यांत स्वप्नाळुपणाला बरेंच वरचें स्थान द्यावें लागेल. या एका वैगुण्यांतून मानवतेचीं अनंत दुःखें निर्माण झालीं आहेत. उन्हाकडे रंगीत कांचेंतून पाहणाराला त्याचें स्वरूप सौम्य दिसावें आणि तें चांदण्यासारखें शीतल आहे म्हणून त्यानें जगाला सांगत सुटावें ना ? तसा स्वप्नाळु मनुष्य या जगांत वावरत असतो. तो प्रीतीला अमरपद बहाल करून तिची पूजा करूं लागतो. प्रत्येक मनुष्याच्या अंतःकरणांत देव आहे अशा समजुतीनें कुणाच्याही मांडीवर डोकें ठेवून तो निर्भयपणें झोंपीं जातो. आयुष्याच्या प्याल्यांत विष आणि अमृत हीं कमीअधिक प्रमाणांत नेहमींच मिसळलेलीं असतात, याची जाणीव करून घ्यायला त्याचें मन सहसा तयार होत नाहीं !

पण मनुष्य म्हणजे सत्य आणि असत्य, दया आणि क्रौर्य, उदात्तपणा आणि क्षुद्रपणा, देवत्व आणि पशुत्व, या परस्पर-

विरोधी गोष्टींचा विलक्षण संकर आहे ! या सत्याचा जो स्वतःला विसर पडूं देत नाहीं, तोच जीवनाचें वास्तव स्वरूप जाणून जगाला मार्गदर्शन करूं शकतो. बाकीचे सर्व—मग ते कवि असोत, संत असोत, ध्येयवादी असोत अथवा अन्य श्रेष्ठ लोक असोत—न कळत स्वप्नाळुपणानें जशी स्वतःची वंचना करून घेतात, तशी ते आपल्यामागून आंधळेपणानें येणाऱ्या हजारों जीवांचीही फसवणूक करतात.



## शृंखला २

सिंहासनावर झोंपलेल्या एका म्हाताऱ्या राणीला वारा घालीत चार गुलाम उभे होते. ती राणी घोरत होती. तिच्या मांडीवर घुर्र घुर्र करीत मोठ्या आरामांत पडलेलें एक मांजर त्या गुलामांच्याकडे आळसावलेल्या नजरेनें पहात होतें.

पहिला गुलाम म्हणाला, 'ही झोंपलेली थेरडी किती भयंकर कुरूप दिसतेय! तिचं हें लोंबणारं तोंड पहा. जणुं कांहीं एखादा ब्रह्मसमंध हिचा गळा दाबीत आहे असं हिच्या श्वासावरून वाटतं!'

मांजर घुर्र घुर्र करीत बोललें, 'तुम्ही चालते बोलते गुलाम जितके ओंगळ दिसतां तितकी कांहीं ही म्हातारी कुरूप नाहीं !'

दुसरा गुलाम उद्गारला, 'झोंपेंत हिच्या तोंडावरल्या सुरकुत्या मावळून जायला हव्या होत्या. पण त्या तर अधिकच स्पष्ट दिसताहेत. तिला कसलं तरी भयंकर स्वप्न पडत असलं पाहिजे.'

मांजर घुरघुरलें, 'हिच्या सारखीच तुम्हांला झोंप लागेल आणि तुम्हांला आपल्या स्वातंत्र्याचीं स्वप्नं पडूं लागतील, तर काय बहार होईल !'

तिसरा गुलाम म्हणाला, 'कदाचित् हिनं क्रूरपणानें ठार मारलेले सर्व लोक स्वप्नांत क्रमाक्रमानें हिच्या डोळ्यां-पुढून जात असतील !'

मांजर घुर्र घुर्र करीत बोललें, 'तुमच्या पूर्वजांचे आणि वंशजांचे थव्वेच्या थव्वे तिच्या डोळ्यांपुढून जात आहेत.'

चौथा गुलाम उद्गारला, 'हिच्याविषयीं अशा गप्पागोष्टी करणं सोपं आहे: पण इथं एकसारखं उभं राहून तिला वारा घालण्यानं आपल्याला येणारा शीण कांहीं त्या गप्पांनीं कमी होत नाहीं.'

मांजर घुरघुरलें, 'तुम्ही सदासर्वदा कुणाला ना कुणाला तरी वारा घालीतच राहणार ! अगदीं मेल्यावर सुद्धां ! या

बाबतींत स्वर्ग कांहीं पृथ्वीहून निराळा नाहीं. तिथंही राजे आहेतच!'

याच क्षणीं त्या म्हाताऱ्या राणीनें पेंगत पेंगत एक मोठी डुलकी घेतली. तिचा मुगुट डळमळला आणि खालीं जमिनी-वर पडला.

पहिला गुलाम घाबरून उद्गारला, 'मोठा अपशकुन आहे हा!'

मांजर घुर्र घुर्र करीत म्हणालें, 'एकाचा अपशकुन हा दुसऱ्याचा शकुन होऊं शकतो.'

दुसरा म्हणाला, 'ही बया जागी झाली आणि आपला मुगुट खालीं पडला आहे, असं तिनं पाहिलं, तर ती तत्काळ आपणां चौघांचा प्राण घेईल!'

मांजर घुरघुरलें, 'तुमच्या जन्मापासून प्रत्येक दिवशीं ती तुमचा जीव घेत आली आहे. तुम्हां शेळपटांना तें अजून कळत मात्र नाहीं!'

तिसरा गुलाम बोलला, 'आपला मुगुट जमिनीवर पडला आहे, हें तिनं पाहिलं तर ती आम्हांला नुसती ठार मारणार नाहीं. मुगुट खालीं पडल्यामुळं क्रुद्ध झालेल्या देवता संतुष्ट करण्याकरितां मीं हें बलिदान केलें, असं ती साऱ्या जगाला सांगत सुटेल.'

मांजर घुर्र घुर्र करीत म्हणालें, 'या जगांत फक्त दुर्बळच देवांना बळी जातात!'

चौथ्या गुलामानें इतरांना गप्प बसविलें आणि त्यानें तो मुगुट हळूच निद्रित राणीच्या मस्तकावर ठेवला.

मांजर घुर्र घुर्र करीत म्हणालें, 'फक्त गुलामच धुळींत पडलेला मुगुट पुन्हां उचलून तो आपल्या मालकाच्या मस्तकावर ठेवीत असतात !'

थोड्या वेळानें ती म्हातारी राणी जागी झाली. इकडे तिकडे पाहून तिनें एक मोठी जांभई दिली. नंतर ती म्हणाली, 'एक चमत्कारिक स्वप्न पडत होतें मला ! त्या स्वप्नांत एका जुनाट झाडाच्या बुंध्याभोंवतीं एक किंघू चार सुरवंटांचा पाठलाग करीत आहे, असं मला दिसलं. किती विचित्र होतं तें स्वप्न !'

डोळे मिटून ती पुन्हां झोंपीं गेली. लवकरच ती घोरूं लागली. ते चार गुलाम तिला पुन्हां वारा घालूं लागले.

मांजर घुर्र घुर्र करीत म्हणालें, 'मूर्खांनों, रहा, असेच वारा घालीत जन्मभर उभे रहा ! या वाऱ्यानं आपली राखरांगोळी करणाऱ्या अग्नीच्या ज्वाळाच आपण फुलवीत आहों, हें तुम्हांला कधीं कळणार ?'



**जगांत गुलामगिरी कशी नांदत राहते याचें जिब्राननें केलेलें हें वर्णन मोठें मार्मिक आणि मर्मभेदक आहे. दुर्बळाचे मुख्य शत्रु**

त्यांच्यावर सत्ता गाजविणारे सबळ नसतात. त्यांचे खरे वैरी ते स्वतःच असतात. राखेच्या ढिगाऱ्याखालीं निखारे विझून जावे, त्याप्रमाणें गुलामांचीं मनें गुलामगिरींत मरून जातात. पुढें पुढें तर आपल्या शृंखलांचा अलंकार म्हणून ते अभिमान बाळगूं लागतात ! या गोष्टींतलें मांजर क्षणाक्षणाला गुलामांच्या स्वाभिमानाला डिवचण्याचा प्रयत्न करीत असतें. पण झोंपलेल्या राणीविषयीं थोडेंसें तुच्छतेनें बोलण्यापलीकडे त्या बिचाऱ्यांची मजलच जाऊं शकत नाहीं ! राणीच्या मस्तकावरून मुगुट खालीं पडतो, तेव्हां गुलामांना तो मोठा अपशकुन वाटतो. तो अपशकुन असलाच तर राणीला; आपल्याला नव्हे, हेंसुद्धां त्या हतभाग्यांच्या लक्षांत येत नाहीं. 'एकाचा अपशकुन हा दुसऱ्याचा शकुन होऊं शकतो' हें मांजराचें वाक्य किती अर्थपूर्ण आहे ! पण तो अर्थ जाणण्याची ताकद जनावराप्रमाणें जगणाऱ्या आणि त्या जीवनांतच आनंद मानणाऱ्या दासांच्या अंगीं कुठून असणार ? 'फक्त गुलामच धुळींत पडलेला मुगुट पुन्हां उचलून तो आपल्या जुलमी मालकाच्या मस्तकावर ठेवीत असतात' या मांजराच्या एका वाक्यांत तर क्रांतीच्या स्फोटाला लागणारी सर्व दारू सांठविलेली आहे. पण त्या दारूचा भडका उडवून देणारी ठिणगी ज्यांच्या अंतःकरणांत नसते, त्यांना तिचा काय उपयोग होणार ?

जुलमी राजाचीं सिंहासनें फक्त सैन्याच्या आधारावर टिकून रहात नाहींत. साम्राज्यवादाच्या महत्त्वाकांक्षा केवळ शस्त्रास्त्रामुळें जगावर राज्य करीत नाहींत. कुबेर होऊं पाहा-

णाऱ्या लोभी धनिकांच्या ऐश्वर्याचे पर्वत आपल्या प्रचंड-पणामुळें कांहीं गोरगरिबांच्या छाताडावर मिरवीत राहात नाहींत. या सर्वांचा–किंबहुना जगांतल्या कुठल्याही अन्यायाचा, जुलुमाचा आणि विषमतेचा–मुख्य आधार एकच असतो! तो म्हणजे त्यांना बळी पडणाऱ्या माणसांचा दुबळेपणा–त्यांच्या आत्म्याचा अधःपात. शरीराच्या गुलामगिरींतून मनाची गुलामगिरी हां हां म्हणतां निर्माण होते. या शेणमेण होऊन गेलेल्या मनांमुळेंच माणसें धर्मांतल्या दंभापुढें माना वांकवितात, राजदंडाच्या जुलमापुढें गुडघे टेंकतात, आणि लक्ष्मीचा चंचलपणा व चवचालपणा पुरापुरा ठाऊक असूनही कुत्र्याप्रमाणें तिचे पाय चाटीत राहतात!

कुठल्याही गुलामांच्या पायांतल्या शृंखला कांहीं केवळ शारीरिक सामर्थ्यानें तुटत नाहींत. त्या सामर्थ्याला आत्मिक शक्तीचा आधार लागतोच लागतो.



## दुसरा समुद्र ३

एक मासा दुसऱ्या माशाला म्हणाला, 'आपल्या ह्या समुद्राच्या वर दुसरा एक समुद्र आहे. त्या समुद्रांतही पोहणारे प्राणी आहेत. आपण जसे इथं राहतों, तसेच ते तिथं राहतात.'

दुसरा मासा त्याला म्हणाला, 'तुझी ही निव्वळ कल्पना आहे, बाबा! आपल्या या समुद्राबाहेर कुणी जरी अगदीं बोटभर गेला आणि तिथंच राहण्याचा प्रयत्न करूं लागला, तर तो तत्काळ मरतो हें तुला ठाऊक आहे ना? मग या वरच्या समुद्रांत दुसरे प्राणी राहतात, हें तुझें म्हणणें आम्ही

खरें कसें मानायचें ? तुझ्या या गप्पांना काय आधार आहे ?'



जगांतल्या अनेक दुःखांचा उगम मनुष्याच्या कल्पनाशक्तीच्या खुरटेपणांत आहे असें म्हटलें तर तें फारसें चुकीचें होणार नाहीं. पंख न फुटलेल्या पिलानें घरट्यालाच आकाश मानावें ना ? तशीं माणसें आयुष्यांत हरघडी व्यक्तिनिष्ठ दृष्टीनें वागत असलेलीं दिसतात. कल्पना ही केवढी प्रेरक व प्रभावी शक्ति आहे, याची त्यांना जाणीवच नसते. पण आइनस्टाइन म्हणतो, 'ज्ञानापेक्षां कल्पनेचंच महत्त्व जीवनांत अधिक आहे.' 'कल्पनाशक्ति हें नीतिप्रसाराचें अमोघ साधन आहे' असे जे शेलेनें उद्गार काढले आहेत, ते अत्यंत अर्थपूर्ण आहेत.

मनुष्याला मनुष्य म्हणून आज जें मोल आलें आहे तें त्याच्या कल्पकतेमुळेंच ! मानवी जीवनाच्या विकासाकरतां धडपडणारे कवि, संत, शास्त्रज्ञ आणि धर्मसंस्थापक यांचीं चरित्रें पाहिलीं तर त्यांची कल्पनाशक्ति अत्यंत तरल व उज्ज्वल होती, असेंच दिसून येईल. राजपुत्र सिद्धार्थाला जगांतल्या दुःखांचा क्षणभरसुद्धां प्रत्यक्ष अनुभव येऊं नये असा त्याच्या पित्यानें कडेकोट बंदोबस्त केला होता. पण एके दिवशीं रस्त्यानें जातां जातां सहजासहजीं जीं दृश्यें सिद्धार्थाला दिसलीं, त्यांतलें दुःख कल्पनेनें त्याला तत्काळ प्रचीत करून दिलें. त्याचें विशाल आणि कोमल मन त्या जाणिवेनें कळवळून गेलें आणि मानवी जीवनांतल्या दुःखाचा परिहार करण्याचा मार्ग शोधण्याकरतां तो भिक्षु होऊन राजवाड्याबाहेर पडला.

शास्त्रज्ञांनीं मानवजातीची जी विविध सेवा केली आहे तिचा उगमही असाच कल्पनेच्या स्वच्छंद पण उदात्त क्रीडेंतच आहे. कल्पनाशक्तीच्या अभावामुळें अनेक माणसें आत्म्याची कुरूपता आणि समाजांतली विषमता जाणायला असमर्थ ठरतात. इतरांवर होणारे जुलूम आणि अन्याय यांचीं चित्रें त्यांना आपल्या डोळ्यांपुढें उभीं करतांच येत नाहींत. त्यामुळें स्वाभाविकच हीं माणस सहानुभूतिशून्य बनतात. सहानुभूति ही सुधारणेची जननी आहे. पण तिचा स्पर्श न झाल्यामुळें माणसांमध्यें परंपरेला चिकटून राहण्याची, चाकोरीबाहेर न जाण्याची आणि आपल्या आंवाक्याबाहेरच्या प्रत्येक गोष्टी-विषयीं अश्रद्ध असण्याची प्रवृत्ति स्थिर होते. या गोष्टींतला दुसरा मासा हा अशा लोकांचा एक नमुना आहे.



## नवा राक्षस

## ४

असाच भटकतां भटकतां मी एकदां एका बेटावर गेलों. तिथें माणसाचें डोकें पण पोलादी पाय असलेला एक राक्षस मला दिसला. तो एकसारखा पृथ्वीच्या पोटांतून निर्माण होणारा प्रत्येक पदार्थ अधाशीपणानें आपल्या घशांत ढकलीत होता—आणि—घटाघट समुद्राचें पाणी पीत होता! कितीतरी वेळ मी त्याच्याकडे पाहत उभा होतों. शेवटीं मी त्याच्याजवळ गेलों आणि त्याला म्हणालों, 'तुला आपलं पोट भरल्याचं समाधान अजून एकदांहि मिळालं नाहीं काय? तुझी भूक आणि तहान हीं कधींच तृप्त होत नाहींत काय?'

त्यानें उत्तर दिलें, 'माझं पोट भरलंय्–माझं समाधान झालंय् ! इतकेंच नव्हे तर या अखंड खाण्यापिण्याचा मला अगदीं कंटाळा आला आहे. पण मला नेहमीं एक भीति वाटते–आज मी स्वस्थ बसलों तर कदाचित् उद्यां मला खायला पृथ्वीवर एक पदार्थही शिल्लक उरणार नाहीं, मला प्यायला समुद्रांत पाण्याचा थेंबही राहणार नाहीं.'



अंधपणानें अमर्याद धनसंचय करणाऱ्या आणि त्या पैशाच्या साहाय्यानें जगावर सत्ता गाजवूं पाहाणाऱ्या आधुनिक पुंजीपती-वरलें हें जिब्रानचें रूपक मोठें सूचक आहे. मस्तकावर सुवर्ण-मुगुट मिरवीत हे लोक मानवतेनें मोठ्या कष्टानें जीवनाच्या पूजेकरतां गोळा केलेलीं फुलें आपल्या पोलादी टांचांखालीं अहर्निश चिरडून टाकीत असतात. लोभ हाच त्यांचा परमेश्वर बनलेला असतो. आणि सर्वांत गमतीची गोष्ट ही कीं, जों जों मनुष्य श्रीमंत होत जातो, तों तों त्याचा लोभ अधिकच वाढत जातो ! तृप्ति हा शब्दच पुंजीपतींच्या कोशांत असूं शकत नाहीं. प्राचीन भारतीय संस्कृतींत मनुष्याच्या विकासाच्या आड येणारे सहा शत्रू मानले असून त्यांत कामवृत्तीला अग्रस्थान दिलें आहे. पण आजच्या जगाकडे पाहिल्यावर मानवतेचा, मानवधर्माचा आणि मानवी आत्म्याचा सर्वांत मोठा शत्रु लोभच आहे, हें कुणीही नाकबूल करणार नाहीं.

## राजाज्ञा

## ५

एकदां एका शहरांतले सर्व प्रतिष्ठित नागरिक आपल्या राजाला भेटायला गेले. राजधानींतल्या माणसांनीं कोणत्याही प्रकारचें मद्य अथवा मादक द्रव्य वापरूं नये, असा महाराजांनीं कायदा करावा ही आपली इच्छा त्यांनीं अत्यंत नम्र शब्दांत त्याच्यापुढें प्रगट केली.

राजा एक शब्दही बोलला नाहीं. त्यांच्याकडे पाठ फिरवून खो खो हंसत तो तिथून निघून गेला. ते बिचारे सभ्य नागरिक विस्मयचकित होऊन परत जायला निघाले.

राजवाड्याच्या दरवाजापाशीं त्यांना राजाचा खासगी

कारभारी भेटला. राजाच्या वर्तनामुळें हे सर्व लोक गोंधळून गेले आहेत, हें त्याच्या लक्षांत आलें. त्यांची सर्व हकीकत ऐकून घेऊन तो म्हणाला, 'मित्रहो, तुम्हीं भलत्या वेळीं राजेसाहेबांची मुलाखत घेतलीत ! सरकार स्वारी तर्र असतांना तुम्ही आपला मद्यबंदीचा विनंति अर्ज घेऊन गेलां असतां तर तो तत्काळ मंजूर झाला असता.'



कल्पकतेइतकाच उपरोध हा जिब्रानच्या प्रतिभेचा प्रभावी विशेष आहे. केवळ स्वैर कल्पनेचा मोहक विलास अथवा स्वच्छंद भावनांचें सुंदर नर्तन ज्यांच्या काव्यकथांत आढळतें, अशा प्रतिभावंतांपेक्षां त्याच्या लिखाणांत जी दाहक वास्तवता आढळते, तिचें श्रेय या विशेषालाच दिलें पाहिजे. त्याच्या या शक्तीचा विलास दाखविणारी अशीच दुसरी एक 'पश्चात्ताप' नांवाची छोटी गोष्ट पहा—

एका काळोख्या रात्रीं एक मनुष्य आपल्या शेजाऱ्याच्या बागेंत हळूच शिरला आणि तिथलें सर्वांत मोठें कलिंगड चोरून त्यानें आपल्या घरीं आणलें. त्यानें तें लगेच फोडलें. तें पिकलेलें नाहीं असें त्याला दिसतांच एक मोठा चमत्कार घडून आला. त्या मनुष्याची सदसद्विवेकबुद्धि एकदम जागृत झाली. तें कलिंगड चोरून आणण्यांत आपण केवढी मोठी चूक केली हें लक्षांत येऊन त्याचें मन पश्चात्तापानें जळूं लागलें !

असल्या गोष्टींतला जिब्रानचा उपरोध इतका स्पष्ट असतो कीं त्यावर कांहीं भाष्य करण्याची जरूरीच नाहीं.



## साधु ६

मी तरुण असतांना एका साधूच्या दर्शनाला गेलों. डोंगरापलीकडल्या प्रशान्त वनराईत तो राहत होता. सद्गुण कशाला म्हणावें यासंबंधानें आमची दोघांची चर्चा सुरू असतांनाच एक थकल्याभागल्या चेहऱ्याचा दरोडेखोर मोठ्या कष्टानें लंगडत लंगडत तिथें आला. साधूजवळ येतांच गुडघे टेकून आणि हात जोडून तो म्हणाला, 'हे सत्पुरुषा, मी तुला शरण आलों आहें. माझ्या मनाला शांति मिळेल या आशेनें मी तुझ्याकडे धांव घेतली आहे. माझ्या पापांचा भार मला असह्य झाला आहे.'

साधूनें उत्तर दिलें, ‘ मित्रा, माझी स्थिति तुझ्यासारखीच आहे. माझ्या डोक्यावरहि पापांचा डोंगर आहे.’

दरोडेखोर म्हणाला, ‘पण महाराज, मी चोर आहें. लुटारू आहें !’

साधु हंसून उद्गारला, ‘ मीही चोर आहें. लुटारू आहें. ’

त्याच्याकडे आश्चर्यानें पाहत दरोडेखोर म्हणाला, ‘ पण मी खुनी आहें, महाराज ! माझ्या हातून मरण पावलेल्या माणसांच्या सूडाच्या इच्छा माझ्या कानांत मोठमोठ्यानें आक्रोश करीत आहेत.’

साधु उत्तरला, ‘ मित्रा, माझाच अनुभव तूं बोलून दाखविलास की !’

विस्फारलेल्या डोळ्यांनीं साधूकडे पाहात दरोडेखोर म्हणाला, ‘माझ्या हातून किती गुन्हे झाले आहेत याची गणती सुद्धां करतां येणार नाहीं.’

साधूनें स्मित करीत उत्तर दिलें, ‘ या बाबतींत मी तुझा सख्खा भाऊ शोभेन !’

तो दरोडेखोर उठून उभा राहिला. क्षणभर त्यानें त्या साधूकडे टक लावून पाहिलें. त्याच्या शून्य निस्तेज दृष्टींत आतां कसल्या तरी नव्या तेजाचा संचार झाला. साधूला वंदन करून तो निघून गेला तेव्हां तो लंगडत नव्हता, कष्टानें चालत नव्हता. एखाद्या कोकराप्रमाणें पटपट उड्या मारीत तो डोंगर उतरून गेला.

मी साधूकडे वळून प्रश्न केला, ‘ हातून कधींहि न घडलेले गुन्हे आपण केले असं तुम्हीं त्या दरोडेखोराला कां सांगितलंत? तुमच्या या बोलण्यानं त्याची तुमच्यावरली श्रद्धा पार उडून गेली, हें तुमच्या लक्षांत आलं नाहीं काय ?’

साधूनें उत्तर दिलें, ‘ त्याची आतां माझ्यावर श्रद्धा उरलेली नाहीं, हें मला कबूल आहे. पण तो आला होता तेव्हां स्वतःच्या जीवनाविषयीं निराश होता. आतां त्याच्या मनांत त्याच्याविषयीं नवी आशा निर्माण झाली आहे.’

त्याच वेळीं दरोडेखोराच्या गाण्याचे सूर लांबून आम्हांला ऐकूं येऊं लागले. त्याच्या गाण्याच्या प्रतिध्वनींनें ती दरी आनंदानें भरून गेली.



पावित्र्यावरल्या पोकळ प्रवचनांनीं पतिताचा उद्धार कधींच होत नाहीं. हातून घडलेल्या पापांनीं त्याचा आत्मा झाकळून टाकलेला असतो. आपण कांहीं चांगलें करूं शकूं असा त्याला विश्वासच वाटत नाहीं. तो विश्वास त्याच्यामध्यें निर्माण करण्यानेंच त्याचें जीवन सुधारण्याचा संभव असतो.

पापें आणि पापी माणसें यांच्याविषयीं सामान्य लोक बाह्यतः तिरस्कार दाखवितात. पण जीं पापें ऐकतांच ते कानांवर हात ठेवतात, तीं स्वतःच्या हातून झालीं म्हणून त्यांना मुळींच वाईट वाटत नाहीं. फक्त तीं या कानाचीं त्या कानाला कळूं नयेत, एवढीच यांची इच्छा असते. म्हणूनच एका

व्यभिचारिणीला दगडाधोंडयांनीं ठेंचून ठार मारायला प्रवृत्त झालेल्या प्रक्षुब्ध जनसंमर्दाला 'ज्याच्या हातून कधीं पाप घडलें नसेल, त्यानेंच हिच्यावर पहिला धोंडा मारावा' असें खिस्तानें सांगतांच त्या अभागिनीच्या शरीरावर एकही दगड येऊन पडला नाहीं! 'इतरांचीं पापें आपल्या डोळयांना दिसतात, आपलीं स्वतःचीं पापें आपल्या पाठीमागें लपलेलीं असतात.' हें सेनेकाचें वाक्यही या दृष्टीनें लक्षांत ठेवण्याजोगें आहे.

पाप ही मानवी मनाची एक प्रकारची शक्तिच असते. पण ती अयोग्य मार्गानें प्रगट होत असते. ज्यांना आपण गुन्हेगार मानतों त्यांच्यापैकीं बहुतेकांचीं पापें अज्ञानांतून, दारिद्र्यांतून, विषमतेंतून किंवा अशाच प्रकारच्या सामाजिक दोषांतून निर्माण झालेलीं असतात. म्हणून पापी मनुष्याला तिरस्कारानें दूर लोटणें हा सामाजिक गुन्हा आहे. त्याला प्रेमपूर्वक आपल्या बरोबरीचा मानून आणि त्याचा आत्मविश्वास जागृत करूनच त्याची सुधारणा होऊं शकेल.



## राजसंन्यास



एके काळीं विशाल देशाचा राजा असलेला एक तरुण मनुष्य डोंगराळ प्रदेशांतल्या एका अरण्यांत एकांतवासांत राहत आहे असें मी ऐकलें. स्वेच्छेनें सिंहासनाचा त्याग करून आणि आपल्या वैभवशाली कर्मभूमीचा मोठ्या आनंदानें निरोप घेऊन तो अरण्यांत रहायला गेला होता.

माझ्या मनांत आलें—जो राजपदाचा मोठ्या लीलेनें त्याग करतो, त्याचें मन त्या राज्यापेक्षां खचित मोठें असलें पाहिजे. अशा पुरुषाला शोधून काढून त्याचें जीवनरहस्य आपण अवश्य जाणून घ्यायला हवें.

तो ज्या अरण्यांत रहात आहे असें मी ऐकलें होतें, तिथें त्याच दिवशीं मी गेलों. तो संन्याशी एका सुरूच्या झाडाखालीं बसला होता. त्याच्या हातांतली बांबूची काठी राजदंडाप्रमाणें दिसत होती. एखाद्या राजाला अभिवादन करावें त्याप्रमाणें मी त्याला मोठ्या आदरानें वंदन केलें.

माझ्याकडे वळून तो मृदु स्वरानें म्हणाला, ‘ या शांत निवांत अरण्यांत तूं कां आला आहेस ? रानावनांतल्या या हिरव्या गार छायांत तूं आपल्या हरपलेल्या श्रेयाचा शोध करीत आहेस, कीं संध्याकाळ झाली म्हणजे घरीं परतण्याची माणसाला जी एक अनिवार ओढ लागते तिनं प्रेरित होऊन तूं या अरण्यांत प्रवेश केला आहेस ?’

मी उत्तरलों, ‘ महाराज, मी केवळ आपल्या दर्शनाकरितां आलों आहें. राजधानींतलें सिंहासन सोडून अरण्यांतल्या तृणासनाचा आपण कां स्वीकार केला, हें जाणून घेण्याची मला फार फार इच्छा आहे ! ’

तो हंसत उद्गारला, ‘ ती तर एक मामुली गोष्ट आहे. माझ्या मनाला मोहिनी घालणाऱ्या मायेचा बुडबुडा एके दिवशीं क्षणार्धांत फुटला. हें कसें घडलें, तें तुला सांगतों–

एके दिवशीं मी राजवाड्यांतल्या एका खिडकींत हवा खात बसलों होतों. माझा खासगी कारभारी आणि दुसऱ्या देशांतून आलेला एक राजदूत खालच्या बागेंतून गप्पागोष्टी

करीत चालले होते. मी बसलों होतों त्या खिडकीखालीं ते आले. तेव्हां खासगी कारभारी स्वतःविषयीं बोलत होता. तो म्हणाला, 'अहो, तसं पाहिलं तर राजेसाहेबांत आणि माझ्यांत असं काय मोठं अंतर आहे ? त्यांच्याप्रमाणें मीही कडक आणि उंची मद्यांचा मोठा भोक्ता आहें. कुठल्याही प्रकारचा जुगार त्यांच्या-इतकाच मलाही आवडतो. आम्हां दोघांत आणखी एक मोठं साम्य आहे. राजाप्रमाणं मीही मोठा संतापी मनुष्य आहें.' ते शब्द माझ्या कानीं पडतात न पडतात तोंच ते दोघे पुढच्या वृक्षराजींत अदृश्य झाले. थोड्या वेळानें ते दोघे परत आले. खासगी कारभाऱ्याची स्वारी आतां माझ्याविषयीं बोलूं लागली होती. तो म्हणत होता—'राजा थेट माझ्या वळणावर गेलाय् हं ! माझ्यासारखाच तो मोठा बांका तिरंदाज आहे. माझ्याप्रमाणें त्यालाही संगीत फार आवडतं. अहो, अधिक काय सांगूं ? दिवसांतून तीन वेळां स्नान केल्याशिवाय मला चैन पडत नाहीं ना ? त्याचंही तसंच आहे.'

क्षणभर थांबून तो संन्याशी पुढें म्हणाला, 'त्याच दिवशीं संध्याकाळीं फक्त अंगावरलें वस्त्र तेवढें बरोबर घेऊन मी कुणालाही न सांगतां राजवाड्यांतून बाहेर पडलों. गुण आणि दुर्गुण यांच्यांत माझ्यापेक्षां काडीचाही फरक नसलेल्या माणसां-चा मालक म्हणून मिरविण्यांत मला आनंद वाटेना !'

मी त्या संन्याशाला म्हणालों, 'मोठी नवलाची गोष्ट आहे ही ! केवळ हे उद्गार कानांवर पडल्यामुळें तुम्ही अफाट

राजवैभवाचा त्याग केलात, हें अनेकांना खरंसुद्धां वाटणार नाहीं.'

तो उत्तरला, 'मित्रा, यांत आश्चर्य वाटण्यासारखं खरोखरच कांहीं नाहीं. एखादी अद्भुत कथा आपल्या कानांवर पडेल, अशा अपेक्षेनं तूं इथं आला असशील. तुझी ती अपेक्षा तृप्त झाली नाहीं म्हणून तुला ही घटना मोठी लोकविलक्षण वाटत असेल. मला मात्र जें घडलं तें अत्यंत स्वाभाविक वाटतं. विविध ऋतूंचें मोहक नृत्य आणि मधुर संगीत यांनीं अखंड नटलेल्या या अरण्यांत आयुष्य घालविण्याकरितां राज्याचा त्याग कोण करणार नाहीं ? निर्जन निवासांतला मूक आनंद, इथं स्वतःची स्वतःला मिळणारी गोड सोबत, या गोष्टी कोलाहलानं भरलेल्या बाहेरच्या जगांत फार दुर्मिळ आहेत. या मानानं फार लहान अशा लाभासाठीं सुद्धां आजपर्यंत कैक लोकांनीं राज्यत्याग केला आहे. पृथ्वीवरलीं सर्व रहस्यं कळावींत म्हणून आपलं उत्तुंग स्थान सोडून खालीं येणारे आणि चिचुंद्रांच्या सहवासांत रमणारे गरुड जगांत अनेक आहेत हें खरें ! पण शाश्वत आणि निःस्वप्न अशा परतत्त्वाच्या स्पर्शासाठीं सर्व सुंदर पण भंगुर स्वप्नांकडे पाठ फिरवणारीं माणसंही या पृथ्वीवर अगणित आहेत. जगाला नग्न सत्य आणि अनावृत सौंदर्य पाहण्याची लाज वाटूं नये म्हणून आपल्या निःसंगपणाचा त्याग करणारे पुरुषही इथं आढळतात. या सर्वांपेक्षां श्रेष्ठ अशी व्यक्तिही मधून मधून आपल्या दृष्टीला पडते.

आपल्या अहंकाराचं एवढसंसुद्धां प्रदर्शन होऊं नये म्हणून त्यानं दुःखाच्या भावनेचा सुद्धां त्याग केलेला असतो !'

एवढें बोलून तो उठला आणि आपल्या हातांतल्या बांबूच्या काठीवर किंचित् रेलून म्हणाला, 'आतां तूं राजधानींत परत जा. वेशीपाशीं उभा रहा. नगरांत प्रवेश करणाऱ्या व त्यांतून बाहेर पडणाऱ्या सर्व लोकांचं तूं निरीक्षण कर. जन्मतः राजा असूनही ज्याची टीचभर जमिनीवर सुद्धां मालकी नाहीं, शरीरावर दुसऱ्याची सत्ता असली तरी जो आपल्या आत्मशक्तीनें इतरांवर अधिकार चालवीत आहे, आणि जो बाह्यतः सत्ताधीश भासला तरी खरोखर स्वतःच्या दासांचा दास आहे, अशीं तिन्ही प्रकारचीं माणसं तूं त्या जनसमूहांतून शोधून काढ.'

त्याचें बोलणें संपलें. तो माझ्याकडे पाहून हंसला. त्याच्या ओठावर हजारों उषःकालांची शोभा सम्मीलित झाली आहे, असा मला भास झाला. लगेच त्यानें माझ्याकडे पाठ फिरविली आणि तो अरण्यांतल्या गर्द झाडींत निघून गेला.

मी नगराकडे परत आलों. त्याच्या उपदेशाप्रमाणें वेशीपाशीं उभा राहून मी जाणाऱ्या येणाऱ्या प्रत्येक माणसाकडे निरखून पाहूं लागलों. त्या दिवसापासून या क्षणापर्यंत माझ्या अंगावरून ज्या असंख्य सावल्या आल्या आणि

गेल्या, त्यांत तिसऱ्या प्रकारच्या माणसांच्या छायाच फार आहेत.



संन्यास—मग त्याचें बाह्य स्वरूप कोणतेंही असो—हा जिवंत मनाचा, जागृत हृदयाचा, बंडखोर आत्म्याचा धर्म आहे, हें जिब्राननें या कथेंत सूचित केलेलें सत्य त्रिकालाबाधित आहे. जगांतलीं बहुतेक माणसें केवळ शरीरानें जगत असतात. शरीर हें निसर्गतः भोगप्रिय असल्यामुळें सत्ता, संपत्ति, कीर्ति, कामुकता, इत्यादिकांच्या विविध पाशांत तें चटकन् गुरफटलें जातें. आणि मग मधांत पडलेल्या माशीसारखी माणसाची स्थिति होते. भोग भोगून मनुष्य कधींच तृप्त होत नाहीं. भोगांत सारीं माणसें सारखींच असतात. माणसाचें मोठेपण त्याच्या त्यागावरून कळतें; भोगावरून नाहीं. महाभारतांतल्या ययातिराजानें अगदीं गलितगात्र होऊन गेल्यावरही पुत्रापासून उसनें तारुण्य घेऊन उपभोगतृप्तीचा जो प्रयत्न केला, तो या अंध भोगलालसेमुळेंच—शरीराच्या लाजिरवाण्या गुलामगिरीमुळेंच ! जगांत पैशाला, सत्तेला, ऐश्वर्याला आणि राजपदाला जो अवास्तव मान मिळतो आणि जें कृत्रिम महत्त्व प्राप्त होतें, तें मनुष्याच्या मनाच्या या दुबळेपणामुळें—त्याच्या शरीराच्या अंध आसक्तीमुळें !

पण ज्यांचीं मनें जिवंत असतात व जगतां जगतां अधिक सबळ होत जातात, तीं माणसें शरीराच्या गुलामगिरींत कुजत पडत नाहींत. त्यांचे जागृत झालेले आत्मे आसक्तीच्या शृंखला तोडून

मुक्त होण्याकरितां अहर्निश धडपडत असतात. जिब्रानच्या या तात्त्विक कथेंतला राजा हा असाच एक मुक्त आत्मा आहे. संत, तत्त्वज्ञ आणि कलावंत हेही अंशतः मुक्त असे आत्मे असतात. म्हणूनच बाह्यतः सत्ताहीन असूनही ते जगावर अधिकार चालवूं शकतात. पण—असले मुक्तात्मे संसारांत सामान्यतः दुर्मिळ असतात. जे आत्मे बाह्यतः स्वतंत्र भासतात, ते सुद्धां या नाहीं त्या अदृश्य पार्थिव पाशानें बद्ध होऊन जागच्या जागीं तडफडत बसतात. आत्म्याची ही गुलामगिरी हें मानवी जीवनांतल्या दुःखांचें एक प्रमुख कारण आहे.



## दोन गरुड आणि एक कोंकरूं ८

एकदां एका कुरणांत एक शेळी आपल्या कोंकराला घेऊन मोठ्या आनंदानें चरत होती. वर उंचावर आभाळांत एक गरुड घिरट्या घालीत अधाशी नजरेनें त्या कोंवळया कोंकराकडे पहात होता. तो आतां खालीं उतरून त्याच्यावर झडप घालणार, इतक्यांत दुसरा गरुड तिथें उपस्थित झाला. बुभुक्षित दृष्टीनें त्या कोंकराकडे पहात तोही आकाशांत फेऱ्या घालूं लागला.

थोडक्याच वेळांत हे दोघे प्रतिस्पर्धी एकमेकावर तुटून पडले. त्यांच्या भयंकर कर्णकर्कश चीत्कारांनीं सारें वातावरण भरून गेलें.

शेळीनें दचकून वर पाहिलें. आकाशांतलें दृश्य पाहून तिला मोठें आश्चर्य वाटलें. ती कोंकराकडे वळून म्हणाली, 'लाडक्या, ह्या दोन पक्ष्यांनीं एकमेकांवर असं तुटून पडावें हें किती चमत्कारिक आहे ! हें विशाल आकाश या दोघांना सहज पुरण्याजोगें आहे. बाळ, पंख असलेल्या आपल्या या बांधवांचं भांडण लवकर थांबावें आणि त्यांच्यांत शांति नांदूं लागावी म्हणून तूं देवाची विनवणी कर.'

कोंकरानें मनःपूर्वक परमेश्वराची प्रार्थना करायला सुरवात केली !



जगांतील सामान्य माणसें नेहमीं नाकासमोर पाहतात आणि जें सहज नजरेला पडेल, तेंच सत्य आहे असें मानून चालतात. तीं बिचारीं आपल्यावरून जग ओळखतात. दररोज भरपूर काम करावें, त्या कामाचा मोबदला म्हणून पोटभर भाकरी मिळवावी आणि आपलीं कच्चींबच्चीं हालअपेष्टा न भोगतां कशीं मोठीं होतील याची काळजी वहावी, या पलीकडे सर्व सामान्य माणसाची सहसा दुसरी कुठलीही महत्त्वाकांक्षा असत नाहीं. हीं माणसें जशीं जगाच्या डोळ्यांत भरण्याजोगी सेवा करूं शकत नाहींत, तसा त्यांच्यापासून जगाला मोठासा उपद्रवही होत नाहीं. पण पृथ्वीच्या पाठीवरलीं सर्व माणसें आपल्यासारखींच साधीं व सरळ आहेत, हा त्यांचा गोड भ्रम फार वेळ टिकूं शकेल, अशी आजच्या जगाची परिस्थितिच नाहीं. मानवी जीवन हा आतां साधा लपंडावाचा किंवा पाठ-

## दोन गरुड आणि एक कोंकरूं ८

एकदां एका कुरणांत एक शेळी आपल्या कोंकराला घेऊन मोठ्या आनंदानें चरत होती. वर उंचावर आभाळांत एक गरुड घिरट्या घालीत अधाशी नजरेनें त्या कोंवळया कोंकराकडे पहात होता. तो आतां खालीं उतरून त्याच्यावर झडप घालणार, इतक्यांत दुसरा गरुड तिथें उपस्थित झाला. बुभुक्षित दृष्टीनें त्या कोंकराकडे पहात तोही आकाशांत फेऱ्या घालूं लागला.

थोडक्याच वेळांत हे दोघे प्रतिस्पर्धी एकमेकावर तुटून पडले. त्यांच्या भयंकर कर्णकर्कश चीत्कारांनीं सारें वातावरण भरून गेलें.

शेळीनें दचकून वर पाहिलें. आकाशांतलें दृश्य पाहून तिला मोठें आश्चर्य वाटलें. ती कोंकराकडे वळून म्हणाली, 'लाडक्या, ह्या दोन पक्ष्यांनीं एकमेकांवर असं तुटून पडावें हें किती चमत्कारिक आहे ! हें विशाल आकाश या दोघांना सहज पुरण्याजोगें आहे. बाळ, पंख असलेल्या आपल्या या बांधवांचं भांडण लवकर थांबावें आणि त्यांच्यांत शांति नांदूं लागावी म्हणून तूं देवाची विनवणी कर.'

कोंकरानें मनःपूर्वक परमेश्वराची प्रार्थना करायला सुरवात केली !



जगांतील सामान्य माणसें नेहमीं नाकासमोर पाहतात आणि जें सहज नजरेला पडेल, तेंच सत्य आहे असें मानून चालतात. तीं बिचारीं आपल्यावरून जग ओळखतात. दररोज भरपूर काम करावें, त्या कामाचा मोबदला म्हणून पोटभर भाकरी मिळवावी आणि आपलीं कच्चींबच्चीं हालअपेष्टा न भोगतां कशीं मोठीं होतील याची काळजी वहावी, या पलीकडे सर्व सामान्य माणसाची सहसा दुसरी कुठलीही महत्त्वाकांक्षा असत नाहीं. हीं माणसें जशीं जगाच्या डोळ्यांत भरण्याजोगी सेवा करूं शकत नाहींत, तसा त्यांच्यापासून जगाला मोठासा उपद्रवही होत नाहीं. पण पृथ्वीच्या पाठीवरलीं सर्व माणसें आपल्यासारखींच साधीं व सरळ आहेत, हा त्यांचा गोड भ्रम फार वेळ टिकूं शकेल, अशी आजच्या जगाची परिस्थितिच नाहीं. मानवी जीवन हा आतां साधा लपंडावाचा किंवा पाठ-

शिवणीचा खेळ राहिलेला नाहीं. त्याला बुद्धिबळाच्या डावाचें स्वरूप आलेलें आहे. कुणाच्या अध्यामध्यांत न पडणारीं जगांतलीं सर्व साधींभोळीं माणसें या डावांतलीं प्यादीं झालीं आहेत आणि निरनिराळ्या राष्ट्रांतले राजकारणी पुढारी, महत्त्वाकांक्षी मुत्सद्दी व बुद्धिवंत भांडवलदार मोठ्या ईर्ष्येनें हा डाव अहोरात्र खेळत आहेत. आजच्या जगांतल्या प्रत्येक घटनेकडे —मग तें महायुद्ध असो अथवा शांतिसभा असो—या सूक्ष्म मर्मभेदी दृष्टीनें सामान्य मनुष्यानें पाहिलें पाहिजे. तरच त्याला यापुढें सुखानें जगतां येण्याची शक्यता निर्माण होण्याचा संभव आहे. या गोष्टींतल्या भोळ्या शेळीप्रमाणें किंवा अजाण कोंकराप्रमाणें प्रत्येक देशांतला बहुजनसमाज आजपर्यंत वागत आला. म्हणूनच अवघ्या वीस वर्षांच्या अंतरानें सुधारणेच्या शिखरावर पोंचलेल्या या विसाव्या शतकांत दोन महायुद्धें झालीं, देशादेशांतून निरपराधी रक्ताच्या महानद्या वाहल्या, कोटयवधि माणसांच्या फुलांसारख्या कोमल मनांची राखरांगोळी होऊन गेली. 'युद्धांतून युद्धच जन्माला येतें' असें मिल्टननें म्हटलें आहे, हें काय इंग्रजांना ठाऊक नव्हतें? 'युद्ध हा मुत्सद्यांचा व्यापार आहे' हें ड्रायडनचें वाक्य काय अमेरिकन लोकांच्या कानांवरून गेलें नसेल? 'मर्मभेदक भाषणांपेक्षां छातींतून अचूक आरपार जाणाऱ्या गोळ्याच अधिक परिणामकारक होतात' या बिस्मार्कच्या वाक्याची विफलता जर्मनीला पहिल्या महायुद्धानें काय पटविली नव्हती? पण युद्ध म्हणजे अनिर्बंध झालेल्या रौरव नरकाचें नग्न नृत्य असतें, हें ठाऊक असूनही, हीं सर्व राष्ट्रें पुन्हां दुसऱ्या महायुद्धांत कळत न कळत ओढलीं गेलींच!

युद्धें हीं बुभुक्षित गरुडांचीं भांडणें असतात. हीं भांडणें कोंकरासारख्या लहान किंवा दुबळ्या असलेल्या देशांनीं कुणाच्या भक्ष्यस्थानीं पडावें याकरितां चाललेलीं असतात !

ज्या दिवशीं जगांतल्या कोंकरांना ही जाणीव तीव्रतेनें होईल आणि गरुडांनाही झडप घालायची भीति वाटेल असा आपला एक कळप करून तीं रहायला शिकतील, त्या दिवशींच नव्या सुखी जगाच्या पायाचा पहिला दगड बसविला जाईल.



## टीकाकार

९

एके दिवशीं संध्याकाळीं समुद्रकिनाऱ्याकडे जायला निघालेला एक घोडेस्वार रस्त्याच्या कडेला असलेल्या एका खानावळीपाशीं आला. अंधार पडत चाललेला पाहून तो घोड्यावरून खालीं उतरला. समुद्राकांठच्या माणसांचीं मनें समुद्रासारखींच विशाल असतात. त्यांना कुठल्याही क्षुद्रतेची कल्पना येत नाहीं. हा मनुष्यही तसाच होता. दरवाजाजवळच्या एका झाडाला आपला घोडा बांधून तो खानावळींत शिरला.

मध्यरात्रीं सारे लोक गाढ झोंपले असतांना एक चोर तिथें आला आणि त्याचा घोडा घेऊन निघून गेला.

सकाळीं घोड्याचा मालक जागा झाला तेव्हां आपला घोडा चोरीला गेला आहे असें त्याला दिसून आलें. आपला घोडा गेला याचें तर त्याला दुःख झालेंच ! पण त्यापेक्षांही त्याला अधिक दुःख झालें तें दुसऱ्या एका गोष्टीचें ! ती म्हणजे कुणातरी मनुष्याला चोरी करण्याची विपरीत बुद्धि उत्पन्न व्हावी, ही होय.

ही चोरीची बातमी ऐकतांच त्याच खानावळींत उतरलेले कांहीं प्रवासी लगबग त्याच्याभोंवतीं जमले आणि गलगा करीत बोलूं लागले.

पहिला म्हणाला, 'तबेल्याच्या बाहेर घोडा बांधण्याचा केवढा मोठा गाढवपणा केलास तूं ! त्याचं फळ आहे हें !'

दुसरा उद्गारला, 'घोड्याला खोडा घातल्याशिवाय त्याला उघड्यावर बांधणं हा निव्वळ महामूर्खपणा आहे.'

तिसरा बोलता झाला, 'या समुद्रतीराकडच्या भागांत घोड्यावरून प्रवास करण्यासारखा दुसरा वेडेपणा नाहीं !'

चौथा अभिप्राय देता झाला, 'ज्यांना चालण्याचा कंटाळा असतो, असे आळशी लोकच घोडे विकत घेतात आणि त्यांच्यावर बसून प्रवास करतात !'

हे सारे उद्गार ऐकून तो प्रवासी चकित झाला. सरते-शेवटीं तो ओरडून म्हणाला, 'मित्रहो ! माझा घोडा चोरीला गेला एवढं कळतांच तुम्ही सारे लोक माझे दोष दाखविण्या-करितां इथं मोठ्या प्रेमानं धांवून आलांत ! पण ज्यानं

माझा घोडा चोरून नेला, त्याच्याविषयीं निंदेचा एक शब्द-सुद्धां तुमच्या तोंडून बाहेर पडूं नये, ही मोठी चमत्कारिक गोष्ट नव्हे काय ?'



जिब्राननें या कथेंत मनुष्यस्वभावाच्या एका विचित्र वैगुण्यावर मोठ्या मार्मिकपणानें बोट ठेवलें आहे. जीवनांत काय किंवा वाङ्मयांत काय, वाहतुकीचें नियंत्रण करणाऱ्या पोलिसाप्रमाणें चौकाचौकांत अगणित टीकाकार उभे असतात. 'आमचें ध्येय फार उच्च आहे. आमचें कार्य अतिशय पवित्र आहे' असे फलक या टीकाकारांनीं हातांत धरलेले असले तरी त्या फलकांवर लिहिलेल्या शब्दांचा त्यांच्या वर्तनाशीं संबंध असतोच असें नाहीं. 'स्त्री आणि वाणी यांच्या पावित्र्याविषयीं लोक नेहमींच साशंक असतात' असें भवभूतीनें म्हटलें आहे. भवभूतीच्या काळांत लोकनिंदेचें क्षेत्र त्यानें वर्णन केल्याप्रमाणें मर्यादित असूं शकेल. पण कालमानाप्रमाणें आतां तें विलक्षण विस्तारलें असून टीका करणारे लोक फक्त स्वतःला वगळून बाकीच्या सर्व जगाच्या प्रतिभेविषयीं, पावित्र्याविषयीं, आणि प्रामाणिकपणाविषयीं सदैव साशंक असतात, असें म्हणायला हरकत नाहीं.

वाङ्मयांतल्या असल्या प्रकारच्या टीकाकारांना आजपर्यंत अनेकांनीं मोठमोठीं शेलापागोटीं दिलीं आहेत. 'टीकाकार म्हणजे पळावें कसें हें जगाला शिकवीत सुटणारा पांगळा मनुष्य होय' असें एकानें म्हटलें आहे. सेंट ब्यूव्हनें 'ज्याचें

घड्याळ इतरांच्यापेक्षां नेहमीं पांच मिनिटें पुढें असतें, त्याला टीकाकार म्हणावें' अशी या प्राण्याची व्याख्या केली आहे. तिसरा एक लेखक म्हणतो, 'माणसांत दोन प्रकारचे दगड नेहमीं आढळतातः एक स्तुतिपाठक आणि दुसरा निंदक !'

समाजांत टीकाकाराचीं महावस्त्रें अंगावर चढवून बसलेलीं बहुतेक माणसें बहुधा निव्वळ निंदक अ· . शेरिडननें आपल्या '*School for Scandals*' या उपरोधपूर्ण प्रहसनाची उभारणी या अनुभवावरच केली आहे. जिब्राननें आपल्या गोष्टींतही हेंच कटु सत्य निराळ्या पद्धतीनें सूचित केलें आहे. खानावळींत उतरलेल्या कुणाचा तरी घोडा चोरीला गेला आहे असें कळतांच सारे प्रवासी तिथें धांवत येतात ! पण चोराचा पाठलाग करण्याची किंवा चोरीचा शोध लावण्याची भाषा त्यांच्यापैकीं एक गृहस्थ बोलत असेल तर शपथ ! जो उठतो तो त्या घोड्याच्या मालकाला मूर्ख ठरवीत सुटतो !

नानाविध संकटांच्या अभ्रांनीं झांकलेल्या आपल्या देशांतही आज असल्या टीकाकारांचे नमुने हवे तेवढे आढळतील. ज्यांना उभ्या जन्मांत घरांतलीं भाऊबंदकीचीं भांडणें मिटवितां आलीं नाहींत, ते जीनांना पाकिस्तान बहाल केल्याबद्दल गांधी आणि नेहरू यांना लाखोली वाहत आहेत ! ज्यांना एखादी शाळासुद्धां नीट चालवितां येत नाहीं, ते या विशाल देशांतल्या अन्नपरिस्थितीबद्दल राजेंद्रबाबूंवर तोंडसुख घेत आहेत ! आणि आपल्या चवचाल चैनींतून ज्यांना एकादी चवलीसुद्धां उपाशी भिकाऱ्याच्या अंगावर फेकण्याची बुद्धि होत नाहीं, ते जयप्रकाशांना समाजवादाविषयीं मार्गदर्शन करीत आहेत !

जोंपर्यंत जगांत टीकाकारांची ही जात जिवंत राहील तोंपर्यंत सुखी आणि सुंदर जीवनाचीं ध्येयवाद्यांचीं स्वप्नें सत्यसृष्टींत उतरूं शकणार नाहींत, असें कुणी म्हटलें तर तें चूक होईल काय ?

## आत्मदर्शन

## १०

राज्याभिषेक संपला. राजा विश्रांतीकरितां आपल्या महालांत आला. गिरिशिखरावर राहणाऱ्या आणि मोठी सिद्धि प्राप्त झालेल्या तीन साधूंनीं त्याच्याकरितां तें मंदिर निर्माण केलें होतें. त्यानें आपला मुकुट काढून खालीं ठेवला. आपल्या अंगावरलीं राजवस्त्रें उतरलीं. आपण आतां सर्वसत्ताधीश झालों असा अभिमानाचा विचार मनांत घोळवीत तो महालाच्या मध्यभागीं उभा राहिला.

एकदम त्यानें वळून पाहिलें. आईनें त्याला दिलेला सुंदर रुपेरी आरसा तिथें हंसत होता. त्या आरशांत एकदम एक नग्न आकृति त्याला दिसली!

राजा दचकला. त्यानें आरशांतून बाहेर येणाऱ्या मनुष्या-ला कंपित स्वरानें विचारलें, 'काय, काय हवंय तला?'

त्या नग्न आकृतीनें उत्तर दिलें, 'फक्त एकच गोष्ट—एकाच प्रश्नाचं उत्तर! लोकांनीं राजा म्हणून तुला सिंहासनावर कां बसविलें, हें तूं मला सांगूं शकशील काय?'

राजा उत्तरला, 'या देशांतला मी सर्वांत थोर मनाचा मनुष्य आहें म्हणून!'

ती नग्न आकृति म्हणाली, 'तुझं मन आहे याहून अधिक थोर असतं तर तूं राजा झाला नसतास.'

राजा उद्गारला, 'मी देशांतला सर्वांत पराक्रमी पुरुष आहें. म्हणून लोकांनीं मला राज्याभिषेक केला!'

ती नग्न आकृति बोलती झाली, 'तूं आहेस यापेक्षां अधिक शूर असतास तर कधींहि सिंहासनावर बसला नसतास!'

राजा पुन्हां म्हणाला, 'मी या देशांतला सर्वांत शहाणा मनुष्य आहें. म्हणून लोकांनीं माझ्या मस्तकावर मुकुट ठेवला.'

ती नग्न आकृति म्हणाली, 'तूं अधिक शहाणा असतास तर राजपदाचा कधींच स्वीकार केला नसतास!'

हें ऐकून राजा मटकन् जमिनीवर बसला आणि गुडघ्यांत मान घालून ढसढसा रडूं लागला.

त्या आरशांतल्या आकृतीनें राजाच्या अवनत मूर्तीकडे सदय दृष्टीनें पाहिलें. मग तिनें जमिनीवरला तो मुकुट

उचलला आणि मोठ्या वात्सल्यानें राजाच्या नम्र झालेल्या मस्तकावर तो ठेवला.

राजाकडे मोठ्या प्रेमानें पहात ती नग्न आकृति पुन्हां आरशांत अंतर्धान पावली.

राजानें हळूहळू आपलें मस्तक वर करून समोरच्या आरशाकडे पाहिलें. तिथें मुकुट धारण केलेलें आपलें प्रतिबिंब तेवढें त्याच्या दृष्टीला पडलें.



जीवनविकासाच्या दृष्टीनें कामक्रोधादि अंध विकारांपेक्षांहि अहंकार हा मनुष्याचा अधिक मोठा शत्रु आहे. आपल्या मोहक आणि चित्रविचित्र पिसाऱ्याकडे अभिमानानें धुंद झालेल्या नजरेनें पाहणाऱ्या मोराला आपल्या कुरूप पायांचें भान राहत नाहीं. माणसाचेंहि तसेंच होतें. अहंकारानें अंध झालेल्या मानवी मनाला आपल्या मर्यादांचें आणि वैगुण्यांचें ज्ञान कधींच होत नाहीं. कौटुंबिक कलहापासून जागतिक युद्धापर्यंत जगांत जे लहान मोठे अनर्थ नित्य घडून आलेले दिसतात, त्यांच्या मुळाशीं अनेकदां दोन अहंकारी मनांचा संघर्षच असतो. दया, प्रेम, भक्ति, कृतज्ञता, इत्यादि हृदयांत उमलणारीं फुलें अहंकारी मनाच्या धगधगत्या ज्वालांमुळें हळूहळू करपून जातात. आणि मग साहजिकच अशा मनुष्याच्या आत्म्याचा विकास खुरटतो.

पण मानवाला दिलेल्या अहंकाराच्या शापाबरोबर निसर्गानें त्याला एक उःशापहि देऊन ठेवला आहे. आत्मपरीक्षणाची

शक्ति हा तो उःशाप होय. स्वतःकडे परक्याच्या दृष्टीनें पाहणें प्रथम दर्शनीं जेवढें वाटतें तेवढें कांहीं अवघड आणि अशक्य नाहीं. जीवनांत जो पदोपदीं स्वतःचा टीकाकार होतो त्याचाच अखंड विकास होत राहतो. या कथेंतली आरशांतून प्रगट होणारी नग्न आकृति हीच मानवाची आत्मपरीक्षणाची शक्ति होय. वस्त्रें आणि अलंकार यांच्या साहाय्यानें शरीराला कृत्रिम सौंदर्य संपादन करतां येतें. आपलें ज्ञान, विकास, पराक्रम, हीं सर्व पूर्णतेला पोचलीं आहेत असें मानणाऱ्या आत्म्याचें सौंदर्यहि असेंच बेगडी असतें. आपण अपूर्ण आहों ही जाणीव ज्याला असते, तोच पूर्णतेच्या कंटकयुक्त पथावरला यशस्वी प्रवासी होऊं शकतो. या कथेंतल्या राजाला ही जाणीव होतांच आरशांतली आकृति त्याच्या मस्तकावर राजमुकुट ठेवते आणि अंतर्धान पावते.



## चार बेडूक

११

नदीच्या कांठाकांठानें एक लांकडाचा भला मोठा ओंडका तरंगत चालला होता. त्याच्यावर तीरावरले चार बेडूक पटकन् उड्या मारून बसले. थोड्या वेळानें तो ओंडका नदीच्या प्रवाहांत सांपडला आणि धारेला लागून वाहत चालला. ते चारही बेडूक जलपर्यटनाच्या या नव्या अनुभवांत अगदीं गुंग होऊन गेले. कारण अशी मजेदार सफर त्यांनीं या पूर्वीं कधींच केली नव्हती !

बऱ्याच वेळानें त्या आनंदाच्या तंद्रींतून जागा होऊन पहिला बेडूक म्हणाला, ‘ खरोखर हा मोठा विलक्षण ओंडका

आहे ! एखाद्या सजीव प्राण्याप्रमाणें तो धांवत पळत चालला आहे. असा ओंडका या पूर्वी जगांत कुणी कधींच पाहिला नसेल!'

यावर दुसरा बेडूक बोलता झाला, 'दोस्त, तूं चुकतोयस्. हा ओंडका लांकडाच्या इतर तुकड्यांप्रमाणेंच निर्जीव आहे. तो बिचारा कसली हालचाल करणार ? अरे वेड्या, नदी समुद्राकडे धांवत पळत चालली आहे आणि आपल्याबरोबर ती आम्हांला व या ओंडक्यालाही घेऊन जात आहे.'

हें ऐकून तिसरा उद्गारला, 'तुम्ही दोघेही साफ चूक आहांत. ओंडका हलत नाहीं आणि नदी वाहत नाहीं. तुम्हांला जी गति दिसतेय् ती आपल्या मनांतल्या विचारशक्तीची आहे. त्या शक्तीशिवाय जगांत कुठलीच हालचाल होऊं शकत नाहीं.'

लगेच त्या तीन बेडकांत या विषयावर मोठा कडाक्याचा वाद्विवाद सुरू झाला. जो तो आपलेंच म्हणणें खरें आहे, असें अट्टाहासानें प्रतिपादन करीत होता. त्यांचें हें भांडण खूपच रंगलें. ते मोठमोठ्यानें बराच वेळ ओरडले. पण किती वेळ झाला तरी त्यांचें एकमत होईना.

इतका वेळ चौथा बेडूक त्यांचें हें भांडण लक्षपूर्वक ऐकत अगदीं स्वस्थ बसला होता. ते तिघे त्याच्याकडे वळले आणि त्याचें मत विचारूं लागले.

चौथा बेडूक म्हणाला, 'तुमच्यापैकीं प्रत्येकजण थोडा-

थोडा बरोबर आहे. सर्वस्वी चूक असा कुणीच नाहीं. ओंडका, पाणी, आणि आपलें मन हीं तिन्ही गतिमान आहेत.'

त्याचें हें बोलणें ऐकून ते तिन्ही बेडूक चिडून गेले. आपलें म्हणणें पूर्ण सत्य नाहीं हें कबूल करायला त्यांच्यापैकीं कुणीच तयार नव्हता. फक्त आपण तेवढे बरोबर आहों आणि बाकीचे दोघे चूक आहेत, असेंच त्या तिघांपैकीं प्रत्येकाचें ठाम मत होतें.

आणि मग एकदम एक विलक्षण गोष्ट घडली!

क्षणार्धांत, त्या तिघां बेडकांनीं एकत्र येऊन त्या चौथ्या बेडकाला ओंडक्यावरून वेगानें वाहणाऱ्या त्या नदीच्या खोल प्रवाहांत ढकलून दिलें!



जगांतल्या असंख्य कलहांचें मूळ कशांत आहे हें आपण शोधूं लागलों तर तें अज्ञानांत आणि त्याहीपेक्षां त्या अज्ञानाला ज्ञान म्हणून कवटाळून बसणाऱ्या मनुष्याच्या अहंकारांत आहे असें आढळून येईल. सत्याइतकी गुंतागुंतीची गोष्ट साऱ्या जगांत दुसरी कुठलीच नसेल. सत्याला सदैव अनेक परस्पर-विरोधी पैलू असतात. जीवनांतल्या मर्यादित अनुभवांमुळें ते सारे पैलू सहसा एका व्यक्तीला दिसूं शकत नाहींत. त्यामुळें जगांत सत्याच्या नांवाखालीं अर्धसत्याचाच बहुधा अधिक पुरस्कार होत असतो.

तसेंच पाहूं गेलें तर सत्य म्हणजे काय आणि तें कसें निश्चित करायचें, हा प्रश्न खरोखरच फार कठिण आहे. तो

किती अवघड आहे हें खालील चुटक्यावरून दिसून येईल–

एके दिवशीं एक गृहस्थ आपल्या मित्रासह नदीतीरावर फिरायला गेला होता. फिरतां फिरतां नदीकडे पहात तो म्हणाला, ‘पाण्यांत मासे कसे मोठ्या मजेंत खेळताहेत पहा.’ त्याचा मित्र त्याला म्हणाला, ‘हें खरं कशावरून? तूं कांहीं मासा नाहींस! तेव्हां पाण्यांत उड्या मारतांना या माशांना आनंदच होत आहे हें तूं कशावरून म्हणतोस?’ त्यावर त्यानें उत्तर दिलें, ‘पण तूं म्हणजे कांहीं मी नव्हे! पाण्यांत स्वच्छंदानें उड्या मारण्यांत या माशांना जी मजा वाटते तिचं ज्ञान मला होणं शक्य नाहीं, हें तरी तूं कशावरून म्हणतोस?’

सत्य हें इंद्रधनुष्याप्रमाणें बहुरंगी असतें हें तर खरेंच! पण तें इंद्रधनुष्याप्रमाणें रम्य मात्र नसतें. तें उग्र असतें–कटु असतें. आणि म्हणूनच सर्वसामान्य मनुष्याला त्याचें संपूर्ण दर्शन दुःसह होतें. ‘सत्य हें विषासारखं आहे. तें अल्प प्रमाणांत घेतलं तरच त्याचा औषधासारखा उपयोग होतो. नाहींतर तें प्राण-घातक ठरतें.’ असें एका लेखकानें जें विनोदानें म्हटलें आहे त्याचा अर्थ झाला तरी हाच आहे! दुसरा एक लेखक म्हणतो, ‘चलनाकरतां जसें शुद्ध सुवर्ण वापरीत नाहींत, तसें संपूर्ण सत्यही समाजाच्या व्यवहाराला उपयोगी पडत नाहीं. त्यांत हीण मिसळलें म्हणजेच त्याचा प्रसार सुलभ होतो.’

सत्याची शाब्दिक पूजा करणाऱ्या पण अर्धसत्यावर जगूं पाहणाऱ्या आजच्या दांभिक जगाचें दर्शन जिब्रानच्या या रूपककथेंत वाचकांना निश्चित होईल.

—※— —※— —※—

## पवनचक्की १२

पवनचक्की वाऱ्याला म्हणाली, ‘किती रुक्ष प्राणी आहेस तूं! तीच गोष्ट एकसारखी करायचा कंटाळा तुला कसा येत नाहीं? तुला वाहायला दुसरी दिशाच मिळत नाहीं काय? मूर्खा, देवदयेनं मला लाभलेल्या शांततेचा तूं क्षणोक्षणीं भंग करीत आहेस हें तुला कधीं कळणार?’

वाऱ्यानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. अनंत अवकाशांत हसत हसत त्यानें आपलें भ्रमण पूर्ववत् सुरू ठेवलें.



गति ह्या जीवनाचा आत्मा आहे आणि प्रगति ही गतींतूनच

निर्माण होण्याची शक्यता असते, या तत्त्वांची जाणीव समाजांत फार क्वचित् आढळते.

व्यक्ति हा विशाल सिंधूंतला एक बिंदु आहे, अफाट वाळवंटांतला तो एक सूक्ष्म कण आहे, जीवनाच्या महावृक्षावरलें तें एक चिमुकलें पान आहे. या दृष्टीनें स्वतःकडे पाहण्याची संवयच माणसानें अद्यापि आपल्या मनाला लावून घेतलेली नाहीं. जो तो नेहमीं स्वतःपुरतें पाहतो. आपल्याला जगाचा मध्यबिंदु समजून तो वागत असतो. स्वतःचें आसन एकदां सुस्थिर झालें म्हणजे जगाला प्रगतीची अथवा क्रांतीची कांहीं जरूरी उरली नाहीं असें त्याला वाटूं लागतें. सनातनी आणि सुधारक किंवा प्रतिगामी आणि क्रांतिकारक असे जे तट समाजांत नेहमीं पडतात त्यांच्या मुळाशीं तरी या संकुचित दृष्टीपेक्षां दुसरें काय असतें ? आजचे सुधारक उद्यां सनातनी ठरतात किंवा कालचे क्रांतिकारक आज प्रतिगामी वाटूं लागतात, या सकृद्दर्शनीं विचित्र भासणाऱ्या घटनेचा उगम तरी कशांत आहे ? मनुष्याच्या अंध आत्मनिष्ठेंतूनच त्याचा उगम होतो. जीवन म्हणजे बदल हें ज्यांना पटतें, त्यांनाच कालाबरोबर हसतमुखानें धांवतां येतें. इतकेंच नव्हे, तर त्या धांवण्याचा त्यांच्या मानसिक प्रकृतीला फायदा होतो. पण ज्यांना आपला संकुचित आणि समाजविन्मुख सुखवस्तुपणा सोडवत नाहीं, ते धांवणाऱ्या काळाला शिव्या देऊं लागतात. त्यांच्या शिव्याशापांना न जुमानतां काळ त्यांना फरपटत नेऊं लागला म्हणजे आपल्यावर फार मोठा अन्याय होत आहे असा ते कांगावा करतात. पण हा कांगावा ऐकण्याकरतां क्षणभर

थांबायला तरी काळाला फुरसद कुठें असते ? तो हसतो व पुढें चालूं लागतो.



# वंशवृक्ष



इशानाची राणी प्रसूति-वेदनांनीं व्याकुळ झाली होती. राजा आणि बडेबडे दरबारी लोक राजवाड्याच्या भव्य दिवाणखान्यांत मोठ्या उत्कंठेनें आणि काळजीनें प्रसूतीच्या क्षणाची वाट पाहत बसले होते.

संध्याकाळीं एक दूत घाईघाईनें आला आणि राजाला अभिवादन करून म्हणाला, 'महाराज, मी मोठ्या आनंदाची वार्ता घेऊन आलों आहें. महाराजांचा कट्टा शत्रु मिहराब काल मृत्यु पावला.'

ही बातमी ऐकतांच राजा आणि दरबारी लोक आपल्या

आसनांवरून लगबगीनें उठले आणि हर्षवायु झाल्यासारखे ओरडूं लागले ! मिहराब मोठा शूर वीर होता. त्याला आयुष्य लाभलें असतें तर त्यानें खात्रीनें इशानाचें राज्य जिंकलें असतें आणि तिथल्या साऱ्या लोकांना आपले गुलाम करून नेलें असतें.

याच वेळीं राजवैद्य दिवाणखान्यांत आला. त्याच्यामागून राणीच्या सुइणीहि आल्या. राजाला वंदन करून राजवैद्य म्हणाला, 'महाराज, आपण अमर झालांत. आपला वंश पिढ्यान् पिढ्या इशानाच्या जनतेवर राज्य करीत राहील. महाराजांना पुत्ररत्न झालंय्. देवानें मोठ्या कृपाळुपणानें आपल्या गादीला वारस दिला आहे.'

राजाचें मन आनंदानें अगदीं धुंद होऊन गेलें. आपल्या आयुष्यांतला हा सुवर्णक्षण आहे, असें त्याला वाटलें. या एका क्षणांत त्याच्या आयुष्यांतल्या दोन मोठ्या गोष्टी घडून आल्या होत्या. अत्यंत प्रबळ अशा त्याच्या शत्रूवर काळानें झडप घातली होती आणि त्याच्या वंशवेलीवर पहिलेंवहिलें पुष्प उमललें होतें.

त्या नगरांत एक धीट, तरुण आणि सत्यवक्ता ज्योतिषी राहत असे. त्याच रात्रीं राजानें त्याला राजवाड्यांत बोलावून आणलें. तो येतांच राजा त्याला म्हणाला, 'माझ्या सिंहासनाचा वारस आज जन्माला आलेला आहे. या मुलाचें

भविष्य आपल्याकडून जाणून घेण्याची मला फार फार इच्छा आहे.'

क्षणभरसुद्धां न चाचरतां तो ज्योतिषी म्हणाला, 'राजा, तुझ्या मुलाचं भविष्य ऐक. काल संध्याकाळीं तुझा शत्रु मिहराब मेला. त्याचा आत्मा एक दिवसभर आपल्याला अनुकूल अशी कूड शोधीत वाऱ्यावर भटकत होता. शेवटीं त्याला योग्य अशी जागा मिळाली. ती म्हणजे नुकत्याच जन्माला आलेल्या तुझ्या मुलाचं शरीर !'

हें ऐकतांच राजा क्रुद्ध होऊन गेला. त्यानें तत्काळ आपली तलवार उपसली आणि त्या सत्यवादी ज्योतिष्याला तिथल्या तिथें ठार केलें.

त्या दिवसापासून आतांपर्यंत इशानांतले सर्व शाहणे लोक एकान्तांत एकमेकांना म्हणतात, 'इशानावर शत्रु राज्य करीत आहे हें कुणाला ठाऊक नाहीं ? प्राचीन काळापासून ही गोष्ट लोक सांगत आले आहेत.'



मनुष्यानें मनुष्याला कायमचा शत्रु मानणें, त्या शत्रुत्वाचा अभिमान बाळगणें आणि आपल्या शत्रूच्या मृत्यूनें आनंदित होणें, या गोष्टी किती चुकीच्या आहेत हें एका चमत्कृतिजनक कल्पनेचा उपयोग करून जिब्राननें या गोष्टींत सूचित केलें आहे. ज्या मुलाच्या जन्माचा राजाला विलक्षण अभिमान वाटतो, त्याचा आत्मा त्याच्या शत्रूचा असावा, हा विरोध अत्यंत विलक्षण आहे.

जीवनांत केवळ आंधळ्या आत्मलेपणामुळें मनुष्य कांहीं व्यक्तींवर प्रेम करूं लागतो. केवळ अंध स्वार्थामुळें कांहीं व्यक्ती त्याला शत्रुवत् वाटूं लागतात आणि तो त्यांचा द्वेष करीत सुटतो. पण मानवी जीवन हा जन्म आणि मृत्यु हीं दोनच दारें असलेला एक पिंजरा आहे! या टीचभर पिंजऱ्याच्या आंत मनुष्य रागालोभानें प्रेरित होऊन जें वर्तन करतो, तें पिंजऱ्याबाहेरच्या विशाल आणि अज्ञात जगांतल्या नियमांना धरून होतें असें थोडेंच आहे? वंश, जाति, धर्म, इत्यादिकांचे माणसांचे अभिमान हे रंगीबेरंगी फुगे आहेत. ज्यांचीं मनें लहान मुलांसारखीं अविकसित असतात, तीं माणसें हे फुगे फुगवीत बसण्यांत आनंद मानतात आणि कुठलीहि टांचणी लागून ते फुटले म्हणजे संतापून जातात. ज्यांना अंतर्मुख होऊन जीवनाचा विचार करतां येतो, ज्ञेयाची अज्ञेयाशीं सांगड घालतां येते, तीं माणसें असलीं फसवीं खेळणीं दूर भिरकावून देतात. मनुष्य इथून तिथून एकच आहे, माणसा-माणसांतले भेदभाव कृत्रिम आहेत, ते नाहींसे करण्यांत-च मनुष्यजन्माचें मोठेपण आहे, हें ओळखून त्या प्रयत्नाला तीं लागतात. जगांतले संत घ्या, कवी घ्या, तत्त्वज्ञ पहा, या सर्वांनीं वंशाच्या आणि जातीच्या खोट्या अभिमानाविरुद्ध आपलें शस्त्र नेहमीं उपसलें आहे असें दिसून येईल.



## चार कवी

## १४

एका मेजाभोंवती चार कवी बसले होते. मेजावरल्या मद्यपात्रांत मदिरा हंसत होती. तिच्याकडे पाहून पहिला कवि म्हणाला, 'माझ्या कल्पनाचक्षूंना ह्या मदिरेचा सुगंध दिसत आहे. प्रफुल्ल वनश्रीवरून अनंत आकाशांत पक्ष्यांचा थवा जसा भिरभिरत असावा तसा भासतोय् तो मला !'

आपली मान वर करून दुसरा कवि म्हणाला, 'माझ्या प्रतिभेला हा पक्ष्यांचा थवा गात असलेलं गाणं ऐकूं येत आहे. पांढऱ्या शुभ्र गुलाबांच्या पाकळ्यांत भ्रमरानं जसं बंदिवान व्हावं; त्याप्रमाणं त्या मधुर संगीतांत माझं हृदय तल्लीन होऊन गेलं आहे!'

तिसऱ्या कवीनें आपले डोळे झांकले आणि एक हात उंच करून तो म्हणाला, 'हा पहा मीं त्या पक्ष्यांना हातसुद्धां लावला ! त्यांच्या मृदुमृदुल पंखांचा स्पर्श किती गुळगुळीत आहे ! जणुं कांहीं एखाद्या निद्रित वनदेवतेचा श्वासच !'

शेवटीं चौथा कवि उठला आणि मेजावरलें मद्यपात्र उचलून तो म्हणाला, 'मित्रहो, दुर्दैवानं मी तुमच्या इतका प्रतिभावान् नाहीं. तुमच्याप्रमाणें मला दिव्य दृष्टि, दिव्य श्रवणशक्ति, आणि दिव्य स्पर्श ह्यांचा लाभ झालेला नाहीं. मला या मद्याचा सुगंध येत नाहीं, त्याचं मधुर गीत ऐकूं येत नाहीं, त्याच्या पंखांचा मृदु स्पर्शहि जाणवत नाहीं. मला फक्त या समोरल्या पात्रांत चमकत असलेली मदिरा दिसते. माझी मंद कल्पनाशक्ति उत्तेजित व्हावी आणि तुम्ही ज्या उच्च आनंददायक विश्वांत विहार करीत आहांत तिथं मला उड्डाण करतां यावं म्हणून मी ती प्राशन करतों.'

असें म्हणून त्यानें तें मद्यपात्र आपल्या तोंडाला लावलें आणि त्यांतला थेंब नि थेंब पिऊन टाकला.

ते तिघे कवी आ वासून त्याच्याकडे आश्चर्यानें पाहूं लागले ! आतां त्यांच्या नजरेंत एक प्रकारचा विखार दिसूं लागला. त्यांच्या दृष्टींत काव्यदिव्य बिलकुल उरलें नव्हतें. फक्त दारूचा एक थेंबहि न मिळाल्यामुळें दिसणारी क्रूर अतृप्तता तेवढी होती.



जिब्रानची ही गोष्ट मोठी गंमतीदार आहे. आपल्या

देशाच्या आजच्या परिस्थितीवर टीका करण्याकरितां एखाद्या कल्पक लेखकानें तर ती लिहिली नाहीं ना, असा भास उत्पन्न होण्याइतका ताजेपणा तिच्यांत आहे. या कथेंतल्या चार कवींपैकीं तीन नुसते बडबडे आहेत. आपण मोठे कवी आहोंत हें सिद्ध करण्याकरितां मद्याला स्पर्श करण्यापूर्वीच ते दारू प्याल्यासारखे बोलूं लागतात. त्यांच्या त्या बोलण्यांत अनुभवाची आंच नाहीं, अतृप्तीची तळमळ नाहीं, वास्तवतेचा विलास नाहीं, कांहीं नाहीं. सारा स्वैर कल्पनेचा पोकळ खेळ आहे! एकानें मद्याचा सुगंध पक्ष्यांच्या थव्यासारखा आहे असें म्हटल्याबरोबर दुसऱ्याला त्या पांखरांचें गाणें ऐकूं येऊं लागलें. त्याच्यावर मात करण्याकरितां तिसरा आपल्याला त्या पांखरांच्या पंखांचा गुळगुळीतपणासुद्धां जाणवतो अशी बढाई मारतो!

या तीन कवींच्या रूपानें जिब्राननें मानवी स्वभावांतला एक अतिशय विचित्र दोष मोठ्या मार्मिकपणानें दिग्दर्शित केला आहे. आपल्या भोंवतालीं चाललेल्या घडामोडींविषयीं आपण खूपखूप बोलत असतों, असें व्हायला हवें आणि तसें होतां कामा नये, असें आपण तावातावानें म्हणतों. पण हा सारा शब्दांचा खेळ असतो. जीवनांत क्रांति होते ती केवळ कल्पनेनें नाहीं तर प्रत्यक्ष कृतीनें, हें कांहीं केल्या आपल्या लक्षांतच येत नाहीं. रस्त्यावर पडलेल्या दगडांमुळें गाडीची वाट अडली, तर असली बोलकी मंडळी आपल्या सामाजिक अनास्थेविषयीं तास दोन तास व्याख्यान देतील; पण गाडींतून खालीं उतरून ते दगड दूर फेकून द्यावे आणि आपली वाट मोकळी करून घ्यावी

असें मात्र त्यांच्या मनांत येणार नाहीं ! अशीं माणसें जीवनांत अपेशी ठरलीं तर त्यांत नवल कसलें ?

या गोष्टींतहि तसेंच घडतें. पहिले तीन कवी मद्याचें काल्पनिक वर्णन करण्यांतच गुंग होऊन जातात. चौथा मनुष्य व्यवहारज्ञ असल्यामुळें बडबड न करतां तें पिऊन टाकतो !

कल्पना आणि विचार यांना जीवनांत महत्त्व नाहीं, असें नाहीं. पण ज्याला जगांत यशस्वी व्हायचें असेल त्यानें आपली कल्पना कृतींत उतरविली पाहिजे, विचाराचें आचारांत रूपांतर केलें पाहिजे. व्यवहार हीच काव्याची अथवा तत्त्वज्ञानाची खरी कसोटी आहे.



## कागद आणि शाई

## १५

बर्फासारख्या पांढऱ्या शुभ्र कागदाचा तुकडा होता तो!

तो तुकडा अभिमानानें स्वतःशींच म्हणाला, 'जन्मतःच मी किती स्वच्छ आणि शुद्ध आहे! जन्मभर मी असाच शुभ्र आणि शुद्ध रहाणार! कुणी मला जाळून माझी पांढरी राख केली तरी बेहत्तर! पण माझ्या शुभ्रपणाला कलंक लावणाऱ्या कुठल्याही अस्वच्छ काळया गोष्टीला मी माझ्या वाऱ्याला सुद्धां फिरकूं देणार नाहीं.'

कागदाचें बोलणें शाईनें ऐकलें. तिच्या काळसर चेहऱ्यावर हास्याची छटा उमटली. पण कागदाजवळ जाण्याचें कांहीं

तिला धैर्य झालें नाहीं. नाना रंगाच्या पेन्सिलींनींही कागदाची ही बढाई ऐकली. त्याही त्याच्या आसपास फिरकल्या नाहींत.

आणि तो दुधासारखा, बर्फासारखा, किंबहुना पौर्णिमेच्या चांदण्यासारखा असलेला पांढरा शुभ्र कागद कायमचा स्वच्छ आणि शुद्ध राहिला !

किती स्वच्छ–किती शुभ्र–किती शुद्ध !

पण जितका शुभ्र, जितका शुद्ध, तितकाच शून्य–अगदीं कोरा !



अहंकाराला बळी पडून आणि भलत्याच गोष्टीचा अभिमान बाळगून मनुष्य वागूं लागला म्हणजे तो स्वतःचेंच कसें नुकसान करून घेतो, हें या गोष्टीवरून सहज दिसून येईल. मी बुद्धीनें मोठा आहें, मी उच्च जातीचा आहें, मी फार पवित्र आहें, या किंवा असल्याच बढाया मारीत जे गर्विष्ठ लोक आढ्यतेनें समाजापासून फटकून राहतात, त्यांचें जीवन शेवटीं नीरस आणि निरुपयोगी होतें. त्यांच्या अंगांतल्या गुणांचा कुणालाच उपयोग होऊं शकत नाहीं. मानवी जीवनाची सफलता सहकार्यांत आहे. सर्वांनीं मिळून मिसळून आणि एकमेकांच्या गुणांचा उपयोग करून जग अधिक सुखी व सुंदर करण्यांत जीवनाचें सार्थक आहे. पण आपल्या शुभ्रपणाच्या धुंदींत असलेल्या कागदाला कांहीं केल्या हा साधा सुविचार सुचला नाहीं. शाई दिसायला काळी असली तरी तिनें लिहिलेल्या अक्षरांनींच या जगांत आपली किंमत वाढणार आहे, ही कल्पनाच त्या बिचाऱ्याच्या मनाला

शिवत नाहीं. तो आपल्या शुद्धतेच्या भ्रामक कल्पनेंतच गुंग होऊन बसतो !

मोठेपणाच्या असल्या खोट्या कल्पना उराशीं बाळगून जगाला तुच्छ लेखणाऱ्या माणसाची स्थिति शेवटीं या गोष्टींतल्या कागदासारखीच होते. गुलाबाला कांटे असतात म्हणून त्याचें फूल तोडायला जो तयार होणार नाहीं, त्याला या जगांत त्याचा मधुर सुगंध तरी कुठून मिळणार ?



## पंडित आणि कवि

## १६

सर्प चंडोल पक्ष्याला म्हणाला, ‘ तूं उंच उंच उडतोस. पण पृथ्वीच्या अंतरंगांत जिथं जीवनरसाचे प्रवाह शांतपणानं वहात असतात अशा निवांत जागीं कांहीं तुला जातां येत नाहीं.’

चंडोलानें उत्तर दिलें, ‘ मित्रा, तुला खूप खूप गोष्टींची माहिती आहे हें मी कबूल करतों. किंबहुना तूं या जगांतला सर्वश्रेष्ठ महापंडित आहेस हें मला मान्य आहे. पण तुला उडतां येत नाहीं याबद्दल मला तुझी दया येते.’

जणुं कांहीं चंडोलाचें बोलणें आपल्याला ऐकूं आलेंच नाहीं अशा आविर्भावानें सर्प उद्गारला, ‘ अरे वेड्या, पृथ्वीच्या पोटांत

असलेलीं अगणित रहस्यं तूं एकदां तरी पाहिलीं आहेस काय? या अदृश्य साम्राज्यांतल्या रत्नभांडाराचं तुला ओझरतं दर्शन-सुद्धां झालेलं नाहीं. कालच मी माणकांनीं भरलेल्या एका गुहेंत आराम करीत पडलों होतों. पिकलेल्या डाळिंबाच्या आंतल्या भागाप्रमाणें ती गुहा दिसते. प्रकाशाचा अंधुक किरण तिच्यांत पडला कीं, अग्निज्वाळांसारख्या लाल लाल पाकळ्या असलेल्या गुलाबाप्रमाणं ती भासूं लागते. असलं अद्भुत सौंदर्य पाहण्याचं भाग्य माझ्याशिवाय दुसऱ्या कुणाला लाभलं आहे का?'

चंडोल उद्गारला, 'युगानुयुगांच्या स्मृतींच्या स्फटिकतुल्य सुंदर अवशेषांत लोळण्याचं भाग्य तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणालाही मिळालेलं नाहीं, हें खरं आहे. पण मित्रा, एका गोष्टीबद्दल मला तुझी कींव येते. ती म्हणजे तुला गातां येत नाहीं ही होय.'

साप म्हणाला, 'मला एक वनस्पति ठाऊक आहे. पृथ्वीच्या पोटांत तिचीं मुळं अगदीं खोल खोल गेलीं आहेत. त्या वनस्पतीचं मूळ जो खातो तो यक्षगंधर्वांपेक्षां अधिक सुंदर दिसूं लागतो!'

चंडोलानें उत्तर दिलें, 'पृथ्वीच्या पोटांतल्या विविध आणि अद्भुत चमत्कारांची माहिती जगाला तुझ्याइतकी दुसरं कुणीच सांगूं शकणार नाहीं हें खरं आहे. पण तुला आभाळांत उडतां येत नाहीं हें पाहून मला तुझ्याबद्दल फार फार वाईट वाटतं.'

साप म्हणाला, ‘ एके ठिकाणीं पर्वताखालून वाहणारा एक जांभळ्या पाण्याचा झरा मला ठाऊक आहे. त्या झऱ्याचं पाणी जो पितो तो देवाप्रमाणं अमर होतो. तुलाच काय, पण कुणाही पशुपक्ष्याला तो झरा कधींही शोधून काढतां येणार नाहीं. ’

चंडोल उद्गारला, ‘ तुझी इच्छा असली तर तुलाही देवा-प्रमाणं अमर होतां येईल हें मी नाकबूल करीत नाहीं. पण एका बाबतींत मला तुझी फार फार दया येते. ती गोष्ट म्हणजे तुला गातां येत नाहीं ही होय ! ’

साप ऐटीनें सांगू लागला, ‘ पृथ्वीच्या पोटांत पुरलं गेलेलं एक देवालय मला ठाऊक आहे. महिन्यांतून एकदां मी तिथं जातों. ज्यांची आतां कुणाला आठवणही राहिलेली नाहीं अशा प्राचीन काळांतल्या अजस्र मनुष्यांनीं तें बांधलेलं आहे. त्या देवळाच्या भिंतीवर युगानुयुगांचीं रहस्यें कोरलेलीं आहेत. जो तीं वाचील त्याला जगांतलं सर्वश्रेष्ठ ज्ञान प्राप्त होईल. ’

चंडोल म्हणाला, ‘ तुझी इच्छा असली तर तुझ्या चपळ शरीरानं तें सर्व ज्ञान तुला अंकित करतां येईल. पण तुला उडतां येत नाहीं याबद्दल मला तुझी फार फार कींव येते. ’

चंडोलाच्या या तुणतुण्याचा सापाला वीट आला. चटकन् वळून तो आपल्या बिळांत शिरूं लागला. आंत जातां जातां तो पुटपुटला, ‘ महामूर्ख कुठला ! गाण्याशिवाय दुसरं कांहीं सुचत नाहीं बेट्याला ! ’

आणि चंडोलही तिथून उडून दूर जाऊं लागला. जातां जातां

तो गाऊं लागला, 'माझ्या विद्वान् मित्रा, तुला गातां येत नाहीं याबद्दल मला फार फार वाईट वाटतं. हे महापंडिता, तूं फक्त पृथ्वीवर सरपटतोस. पण कांहीं केल्या तुला पृथ्वी सोडून वर उडतां येत नाहीं. याबद्दल मला अतिशय दुःख होतं!'



शास्त्र आणि काव्य किंवा पांडित्य आणि लालित्य यांच्या-मध्यें जो एक सूक्ष्म विरोध असतो, त्याचें चित्रण सर्प आणि चंडोल यांच्या या संवादांत जिब्राननें केलें आहे. 'पंडिताची शाई ही हुतात्म्याच्या रक्तापेक्षां अधिक पवित्र असते' अशी जी एक अरेबियन म्हण आहे तिच्यांत सत्यांश नाहीं असें नाहीं. पण 'जगांतले महापंडित हे सर्वांत शहाणे लोक असतातच असें नाहीं' या उक्तींतही तितकाच अनुभवजन्य अर्थ भरला आहे. ज्ञानाची आणि विज्ञानाची जीवनाला निःसंशय जरूरी आहे. पण तें ज्ञान जीवनविन्मुख असतां कामा नये. त्या विज्ञानानें मानवी भावनांची कद्र करायला हवी! मनुष्य केवळ बुद्धीवर अथवा निव्वळ भावनेवर जगूं शकत नाहीं. ज्ञान आणि काव्य यांच्या बाबतींतही तेंच म्हणतां येईल. तीं परस्परपूरक आहेत. तहानेलेल्या मनुष्याचें काव्य-रस पिऊन समाधान होत नाहीं हें जितकें खरें आहे, तितकेंच केवळ शास्त्रज्ञानानें अथवा पांडित्यानें मनुष्याच्या हृदयाची भूक शांत होऊं शकत नाहीं हेंही खरें आहे. पण आजच्या यंत्रयुगांत कळत न कळत मानव आपल्या जीवनांत ज्ञानाचा बडिवार माजवून त्यांतल्या काव्याकडे पाठ फिरवीत आहे. या

रूपक-कथेंतल्या सर्पाच्या मुखानें जिब्राननें अशा मानवाचें मनोगत वदविलें आहे. उलट बाजूची कैफियत चंडोल देत आहे. आपल्या संचारशक्तीचीं अद्भुत आणि रसभरित वर्णनें तो करूं शकत नाहीं. पण तो सर्पाला एकच गोष्ट सारखी सांगत असतो–'तुला उडतां येत नाहीं, याबद्दल मला वाईट वाटतं. तुला गातां येत नाहीं याचं मला दुःख होतं.'

आजचें जग लक्ष्मीच्या पायांतल्या पैंजणांतल्या तालावर नाचत आहे. शस्त्रास्त्रांचे खणखणाट, तोफांचे गडगडाट आणि अणुबॉंबचे स्फोट हें मानवाच्या जीवनगीताचें आज पार्श्वसंगीत झालें आहे. पण अशा प्रतिकूल स्थितींतही त्यानें एका गोष्टीचा स्वतःला विसर पडूं दिला नाहीं तर अजूनही मानवजातीचा भविष्यकाल मंगल होण्याचा संभव आहे. ती गोष्ट म्हणजे मनुष्याच्या हृदयाला गातां आलें पाहिजे, मानवाच्या आत्म्याला उडतां आलें पाहिजे !



## पुतळा



शेतांत खणतां खणतां एका शेतकऱ्याला एक मोठा मोहक पुतळा सांपडला. अशा सुंदर सुंदर वस्तूंचा हौसेनें संग्रह करणाऱ्या शहरांतल्या एका धनिकाकडे तो पुतळा घेऊन तो गेला. त्या गृहस्थानें खूप मोठी किंमत देऊन तो विकत घेतला. सौदा झाल्यावर दोघांनीं हंसतमुखानें एकमेकांचा निरोप घेतला.

पुतळ्याचे पैसे घेऊन मोठ्या आनंदानें घरीं जातांना तो शेतकरी स्वतःशींच म्हणत होता, 'पैसा हाच माणसाचा खरा प्राण आहे. त्याच्यावांचून त्याचं क्षणभरसुद्धां चालत

नाहीं. असं असून पृथ्वीच्या पोटांत हजार वर्षं पडून राहिलेल्या आणि स्वप्नांत सुद्धां न पाहिलेल्या एका निर्जीव कोरीव दगडाकरितां मला इतके पैसे देणारा हा मनुष्य वेडा तर नसेल ना ?'

पुतळा विकत घेणारा तो रसिक धनिक याच वेळीं मोठ्या प्रेमानें त्या पुतळ्याकडे पहात स्वतःशींच म्हणत होता, 'किती सुंदर प्रतिमा आहे ही ! जणुं कांहीं एखाद्या अलौकिक महात्म्याचं स्वप्नच ! पृथ्वीच्या पोटांत हजार वर्षं शांत निद्रा घेत राहिल्यामुळें या पुतळ्याच्या मुद्रेवर मूर्तिमंत उल्हास नाचत आहे. रुक्ष निर्जीव पैशांच्या मोबदल्यांत असली अपूर्व सुंदर वस्तु मला देऊन टाकणारा तो मनुष्य वेडा तर नसेल ना ?'



एकच पुतळा ! पण त्याच्याकडे पहाण्याची गरीब शेतकऱ्याची दृष्टि आणि श्रीमंत रसिकाची दृष्टि यांत केवढें अंतर आहे ! स्वतःच्या शेतांत सांपडलेल्या पुतळ्याचें सौंदर्य शेतकऱ्याला कळूं शकत नाहीं हें खरें आहे ! पण त्याला तें कळावें तरी कसें ? सूर्य उगवल्यापासून तो मावळेपर्यंत कष्ट करणारानें आकाशांतले मोहक रंग, पृथ्वीवरलीं सुंदर फुलें किंवा अशाच प्रकारच्या इतर रम्य गोष्टी पहाव्या तरी केव्हां ? पोटापाठीमागें धांवणाराला सभोंवतालीं पसरलेल्या सौंदर्याकडे लक्ष द्यायला सवड कुठून मिळणार ? आणि त्याला त्या सौंदर्याचें अस्तित्व जाणवलें तरी त्याचा आस्वाद घ्यायला

लागणारी रसिकता त्याच्यामध्यें कशी विकसित होणार ? या गोष्टींतल्या शेतकऱ्याचा अरसिकपणा समाज त्याला जें दीन, दरिद्री आणि अज्ञानी, अगदीं जनावराप्रमाणें कष्टमय आणि लाजिरवाणें असें जिणें जगायला लावतो, त्यांतूनच निर्माण झाला आहे !

पुतळा विकत घेणारा श्रीमंत या अरसिक शेतकऱ्याला हंसतो ! पण त्याचें तें हंसणें बरोबर आहे असें कोण म्हणूं शकेल ? वाडवडिलांनीं मिळवून ठेवलेल्या गडगंज संपत्तीमुळें ज्यांना काडीचेही कष्ट करावे लागत नाहींत आणि उद्यांचीच काय पण पुढच्या पिढीचीसुद्धां काळजी ज्यांना कधीं क्षणभर बेचैन करीत नाहीं, अशा जीवांना सौंदर्याभोंवतीं गुंजारव करीत राहून त्याचा रस चाखण्याचें काम साधलें तर त्यांत नवल कसलें ?

ज्ञान काय, रसिकता काय, किंवा संस्कृति काय, या साऱ्या गोष्टी बहुधा सुखवस्तु वातावरणांतच फुलतात. पुतळा विकत घेणारा हा श्रीमंत एखाद्या शेतकऱ्याच्या पोटीं जन्माला आला असता तर त्या मूर्तीचें सौंदर्य त्याला कधीं कळलें नसतें ! आणि प्रसंगीं तें कळूनही पोटासाठीं तो पुतळा विकायची पाळी त्याच्यावर आलीच असती !

आजचें जग हें विषम आहे ! त्यांतलें मानवी जीवन अत्यंत अपूर्ण आहे ! जीवन म्हणजे नुसते कष्ट नव्हेत किंवा नुसती कलाही नव्हे ! कष्ट आणि कला यांचा सुंदर संगम जगांतल्या सामान्य मनुष्याच्या आयुष्यांत होईल, तेव्हांच त्याच्या जीवनाला पूर्णता येईल !



## शेवटचा प्रहर

## १८

मध्यरात्र नुकतीच उलटून गेली होती. पहांटेचा पहिला उच्छ्वास वायुलहरीवरून तरंगत आला.

नव्या जगाचा तो अग्रदूत आपल्या शयनगृहांतून बाहेर पडला. अद्यापि कुणीहि न ऐकलेल्या आवाजाचे आपण प्रतिध्वनि आहों अशी त्याची श्रद्धा होती. तो आपल्या घराच्या छपरावर जाऊन उभा राहिला. कितीतरी वेळ तो खालीं दूरवर पसरलेल्या निद्रित नगराकडे पहात उभा होता. मग त्यानें आपलें मस्तक वर केलें आणि जणुं कांहीं त्या शहरांतल्या सर्व झोंपलेल्या माणसांचे निद्राशून्य आत्मे

आपल्याभोंवतीं गोळा झाले आहेत, या भावनेनें त्यानें आपल ओठ उघडले.

तो बोलूं लागला, ' माझ्या मित्रांनों, माझ्या शेजाऱ्या-पाजाऱ्यांनों आणि माझ्या दारावरून दररोज येणाऱ्याजाणाऱ्या नागरिकांनों, तुम्ही झोंपला असतांनाच मी तुमच्याशीं गुजगोष्टी करणार आहें. तुमच्या स्वप्नांच्या दरींत मी विवस्त्र होऊन स्वच्छंद संचार करणार आहें. तुमच्याशीं हितगुज करायला हीच वेळ योग्य आहे असें मला वाटतें. जागेपणीं आतांपेक्षां अनंत पटींनीं तुम्ही निद्रित असतां. अर्थशून्य कोलाहलानें भरून गेलेले तुमचे कान दिवसा बधिर झालेले असतात.

मी दीर्घ काळ तुमच्यावर प्रेम करीत आलों आहें. माझ्या तुमच्यावरल्या या प्रेमाला कोणतीहि मर्यादा माहीत नाहीं.

तुमच्यापैकीं प्रत्येकावर प्रेम करतांना तो तुम्हां सर्वांचा प्रातिनिधि आहे असें मला वाटतें. आणि तुम्हां सर्वांवर प्रेम करतांना जणुं कांहीं आपण एका व्यक्तीवरच प्रेम करीत आहों असा मला भास होतो. माझ्या हृदयांत वसंत ऋतु फुलला तेव्हां मी तुमच्या उद्यानांत गात राहिलों. माझ्या अंतः-करणांतल्या उन्हाळयांत मी तुमच्या मळणीच्या खळ्यांकडे मोठ्या उत्कंठेनें पाहत बसलों.

सुहृदांनों, मी तुम्हां सर्वांवर अगदीं मनापासून प्रेम केलेलें आहे. तुमच्यांतल्या राक्षसासारख्या धिप्पाड मनुष्यावर

आणि दुर्बळ बुटक्यावर, तुमच्यांतल्या अंधारांत चांचपडत चालणारावर आणि पर्वतपठारावर, सूर्यप्रकाशांत नृत्य करणारावर, तुम्हां सर्वांवर माझें सारखेंच प्रेम आहे.

तुमच्यांतल्या दणकटांच्या लोखंडी नालांच्या खुणा माझ्या मांसांत स्पष्ट उमटलेल्या दिसत असूनहि मी तुमच्यावर प्रेम केलें आहे. तुमच्यांतल्या दुबळ्यांनीं माझ्या श्रद्धेचा सारा आधार उध्वस्त केला असला, माझ्या सहनशीलतेचा अगदीं अंत पाहिला असला, तरी त्यांच्यावरहि मी प्रेम करीत आलों आहें.

हे श्रीमंतांनों, तुमच्या मधाचा कडवटपणा माझ्या जिभेला जाणवत असूनहि मीं तुम्हांला कधीं दूर लोटलें नाहीं. हे दरिद्री बांधवांनों, तुमच्यापुढें रिक्त हस्तानें उभें राहतांना माझें मन लज्जेनें भरून जात असलें, तरी मीं तुमच्याकडे क्षणभरहि पाठ फिरविली नाहीं. हातांत उसनो वीणा घेऊन तिच्यावर आंधळेपणानें बोटें फिरविणाऱ्या कवींनों, आत्म-लालनापलीकडे तुम्ही पाऊल टाकूं शकत नाहीं हें कळत असूनहि मी जसें तुमच्यावर प्रेम करीत आलों आहें, तसेंच कुंभारांच्या जमिनींत कुजकीं प्रेतवस्त्रें गोळा करीत बसणाऱ्या या पंडितांवरहि मीं प्रेम केलें आहे.

मूक भूतकालाच्या सान्निध्यांत माझ्या भविष्याची साशंक-तेनें चर्चा करीत बसणारा धर्मोपदेशक आणि आपल्या स्वतःच्या इच्छांच्या प्रतिमा असलेल्या मूर्तींची पूजा करीत बसणारे भक्त, या दोघांवरहि मीं प्रेम करीत आलों आहें.

हातांतला सुखाचा पेला सदैव परिपूर्ण असूनहि तृषित राहाणाऱ्या हे रमणि, तुझें अंतरंग जाणून घेऊन मी तुझ्यावर प्रेम केलें आहे; आणि रात्रीच्या रात्री दुःखांत घालवाव्या लागणाऱ्या हे दुर्दैवी स्त्रिये, तुझ्या जीवनांतल्या करुणेनें आर्द्र होऊन मीं तुझ्यावरहि प्रेम केलें आहे.

बडबड्या मनुष्याला आपला म्हणतांना मी स्वतःशींच उद्गारतों, 'जीवनांत सांगण्यासारखं पुष्कळच असतें.' मुक्या माणसाला हृदयांत स्थान देतांना मी आपल्याशींच गुण गुणतों, 'जें शब्दरूपानं प्रगट होऊन आपल्याला ऐकायला मिळावं म्हणून मी उत्सुक आहें, तें हा मनुष्य मौनाच्या द्वारानंच व्यक्त करीत आहे. नाहीं का ?'

तुमच्यांतले न्यायाधीश आणि टीकाकार यांच्यावरहि मी प्रेम करीत आलों आहें. मात्र मला वधस्तंभावर लटकावलेला पाहून हे लोक नेहमीं एवढेच उद्गार काढीत आले आहेत, 'याचं रक्त मोठ्या तालबद्ध रीतीनं जमिनीवर ठिबकत आहे. याच्या पांढऱ्या शुभ्र कातडीवर तांबड्या रक्तानं रेखली जाणारी आकृति मोठी रमणीय दिसत आहे.'

मी तुम्हां सर्वांवर–तरुणांवर आणि वृद्धांवर, लहानशा झुळुकेनं थरथर कांपणाऱ्या वेलीवर आणि वादळांतहि निश्चल असणाऱ्या विशाल वृक्षावर–सदैव प्रेम करीत आलों आहें.

पण माझ्या या अमर्याद प्रेमामुळेंच तुम्हीं माझ्याकडे

पाठ फिरवावी, ही किती दुःखाची गोष्ट आहे ! चिमुकल्या पेल्यांत भरून दिलेली प्रीति तुम्हांला आवडते. पण ज्याच्यावर लाटा उसळत आहेत, अशा नदीच्या पात्रांतून तिचा आस्वाद घेण्याची तुमची तयारी नाहीं. तुम्हांला प्रीतीची अस्फुट गुणगुण गोड वाटते. पण तीच उच्च स्वरानें हांका मारूं लागली कीं, तुम्ही आपले कान झांकून घेतां.

मी तुम्हां सर्वांवर सदैव प्रेम करीत आलों असल्यामुळें तुम्ही माझ्याविषयीं म्हणत आला आहां, ‘ याचं अंतःकरण फार मृदु, अगदीं दुर्बळ आहे. याला सारासार विचारशक्तिच नाहीं. हा जीवनमार्गावरला अंध प्रवासी आहे. राजाच्या पंक्तीला बसूनहि पक्वान्नांचे तुकडे गोळा करीत सुटणाऱ्या दरिद्री माणसासारखी याची प्रीति आहे. हें दुर्बळाचं प्रेम आहे. कारण सबळ माणसं फक्त प्रबळांचीच पूजा करीत असतात. ’

तुम्हां सर्वांवरच मी अमर्याद प्रेम करीत आलों असल्यामुळें तुम्हीं माझ्याविषयीं नेहमीं म्हणत आलां आहां, ‘ ज्याला एकाचं सौंदर्य आणि दुसऱ्याचा कुरूपपणा यांतलं अंतर जाणतां येत नाहीं अशा आंधळया माणसाचं हें प्रेम आहे. ज्याच्या जिभेची चव मेलेली आहे अशा मनुष्यानं कुठलंहि आंबट, कडवट पेय मद्य म्हणून प्यावं ना ? तशी याची प्रेमाची कल्पना आहे. उदारपणाचा आव आणणाऱ्या

याच्या हृदयांत उद्धटपणा आहे, चढेलपणा आहे, अहंमन्यता आहे. नाहीं तर ‘ तुमचे आईबाप आणि बहीणभाऊ यांच्या-इतकंच मी तुमच्यावर प्रेम करतों ’ असे उद्गार काढण्याचं धाष्टर्य याच्यासारख्या परक्या मनुष्याला कधींतरी झालं असतं काय ?’

एवढीच नव्हे, तर अशी आणखी पुष्कळ टीका तुम्ही माझ्यावर करीत आला आहां. अनेकदां बाजारपेठेंत माझ्या-कडे बोटें दाखवून उपहासानें तुम्हीं उद्गार काढले आहेत, ‘ पहा, तो वेडा पहा ! एवढा घोडा वाढलाय्–इतके पावसाळे पाहिले आहेत; पण अजून बेट्याचा पोरकटपणा जात नाहीं. दुपारीं तो आमच्या मुलांबाळांबरोबर लहानापेक्षां लहान होऊन नाना प्रकारचे खेळ खेळत बसतो; आणि संध्या-काळ झाली म्हणजे प्रौढांच्या बैठकींत बसून शहाणपणाचा आणि समंजसपणाचा आव आणतो. ’

हें सारें वारंवार ऐकून मी मनाशीं म्हणालों, ‘ असल्या टीकेनं मी माझं प्रेम कधींच कमी होऊं देणार नाहीं. उलट, पूर्वींपेक्षां यांच्यावर मी अधिक प्रेम करीन. पण यांचं प्रेम संपादन करण्याकरितां मला एक गोष्ट केली पाहिजे. माझी प्रीति द्वेषासारखी दिसेल, माझा गोडवा कडूपणाच्या आड लपेल असं मीं वागायला हवं. लोखंडी मुखवटा चढवून, अंगांत चिलखत घालून आणि हातांत शस्त्रं घेऊन मी यापुढें त्यांच्या भेटीला जात जाइन.’

मग मीं तुमच्या जखमांवर जोरजोरानें प्रहार केले. काळोख्या रात्रीच्या घनघोर वादळाप्रमाणें मी तुमच्या कानापाशीं गर्जना करूं लागलों. घराच्या छपरावर उभा राहून सर्वांना ऐकूं जाईल अशा उच्च स्वरानें मीं तुमची निंदा करायला सुरवात केली. मी म्हणालों, 'हे सारे लोक ढोंगी आहेत. हे लुच्चे आहेत, लबाड आहेत, नास्तिक आहेत. या पृथ्वीवरले पोकळ बुडबुडे आहेत हे!'

तुमच्यापैकीं जे संकुचित दृष्टीचे आहेत, त्यांची मीं आंधळ्या वटवाघुळाशीं तुलना केली. जे व्यवहारांत मग्न आहेत, त्यांना चिचुंद्रा म्हणून मीं हिणवलें.

तुमच्यापैकीं जे बोलके आहेत त्यांची दोन जिभा असलेले लोक अशी मीं संभावना केली. जे अबोल आहेत, त्यांचे ओठ पाषाणाचे आहेत, असें म्हटलें. जे साधेभोळे आहेत, त्यांना मरणाचा कंटाळा न येणारे मृत आत्मे असें मी संबोधूं लागलों.

ऐहिक ज्ञानाच्या मागें लागलेल्यांची परमात्म्याचे विरोधक म्हणून मीं निंदा केली. ज्यांना परमार्थाशिवाय दुसऱ्या कशाचीहि पर्वा नव्हती, ते उथळ पाण्यांत जाळीं टाकून आपलींच प्रतिबिंबें पकडीत आहेत, ते सावल्यांची पारध करीत आहेत, असें मी सांगत सुटलों.

अशा रीतीनें माझे ओठ क्षणोक्षणीं तुमचा धिक्कार करीत होते. पण आंतल्या आंत रक्तबंबाळ झालेलें माझें

हृदय तुम्हांला मोठ्या स्नेहपूर्ण स्वरानें साद घालीत होतें.

स्वतःकडूनच चाबकाचे फटकारे खाल्लेली माझी प्रीति हें सारें बोलत होती. अर्धामुर्धा ठार झालेला आणि धुळी-मध्यें फडफड करीत पडलेला माझा अहंकार हे उद्गार काढीत होता. तुमच्या प्रेमाची माझी भूक अतृप्त होती. ती सर्वांना ऐकूं जाईल अशा रीतीनें घराच्या छपरावरून हें अकांडतांडव करीत होती. पण त्याच वेळीं माझी तुमच्या-विषयींची प्रीति हृदयाच्या एकांतांत गुडघे टेकून तुमची क्षमा मागत होती.

अशा स्थितींत एक मोठा चमत्कार घडून आला!

माझ्या या सोंगानेंच तुमचे डोळे उघडले. खऱ्याखुऱ्या प्रीतीऐवजीं द्वेषाच्या या नाटकानें तुमचीं अंतःकरणें जागृत केलीं.

आतां तुम्हीं माझ्यावर प्रेम करूं लागला आहां. तुमच्या-वर प्रहार करणाऱ्या तरवारीला तुम्ही आलिंगन देत आहां. तुमच्या छातींत घुसूं पाहणाऱ्या बाणाला तुम्ही जवळ करीत आहां. जखमी होण्यानेंच तुम्हांला समाधान लाभतें. स्वतःचें रक्त प्राशन केल्यावरच प्रेम करायला आवश्यक असलेला उन्माद तुम्हांला लाभूं शकतो.

दीपज्योतीवर झडप घालून जळून जाणाऱ्या पतंगाप्रमाणें तुम्ही दररोज माझ्या बागेंत गोळा होतां. तुमचा जीवनपट

मी फाडून टाकीत असतांना तुम्हीं माझ्याकडे आदरानें पाहतां. तुम्ही आपापसांत कुजबुजतां, 'ईश्वराची दिव्य-दृष्टि याला लाभली आहे. प्राचीन काळच्या द्रष्ट्याप्रमाणें याचा प्रत्येक शब्द याच्या अंतःकरणाचा ठाव घेतो. हा आमच्या आत्म्यावरले मोहाचे पडदे दूर करण्याकरितां अव-तरला आहे. कड्याकुलपं घातलेलीं आमचीं हृदयं तो भराभर उघडीत आहे. कोल्ह्याचे सर्व मार्ग ठाऊक असलेल्या गरुडा-प्रमाणं आमचीं सर्व वैगुण्यं तो सहज जाणूं शकतो.'

मित्रांनों, तुमचे सर्व जीवनमार्ग मला परिचित आहेत हें खरें. पण मी तुमच्याकडे पाहतों, ते कोल्ह्याकडे पाहणाऱ्या गरुडाच्या नजरेनें नव्हे. तर पंख फुटलेल्या आपल्या पिलांकडे पाहणाऱ्या गरुडाच्या दृष्टीनें !

माझें हें रहस्य तुमच्यापाशीं मी मोठ्या आनंदानें प्रगट करींन. पण तुम्हीं माझ्याजवळ असावें या तीव्र इच्छेमुळेंच मी तुमच्यापासून दूर असल्याचें नाटक करीत राहत आहें. तुमच्या प्रीतीला ओहोटी लागेल या भीतीनें माझ्या प्रीतीची भरती मी थोपवून धरीत आहें.'

एवढें बोलून त्यानें आपला चेहरा दोन्ही हातांनीं झांकून घेतला आणि तो ओक्साबोक्शीं रडूं लागला. हृदय उघडें केल्यामुळें अपमानित झालेली प्रीति द्वेषाचें सोंग घेऊन विजय मिळविणाऱ्या प्रीतीपेक्षां श्रेष्ठ असते, हें कांहीं केल्या तो विसरूं शकत नव्हता. त्याचें मन लज्जेनें भरून गेलें.

मग एकदम त्यानें आपलें मस्तक वर उचललें आणि झोंपेंतून एकाएकीं जागया होणाऱ्या मनुष्याप्रमाणें आपले दोन्ही बाहू पसरून तो उद्गारला, ‘ सुहृदांनों, आतां रात्र संपत आली आहे. प्रभातकाळ पर्वतांच्या शिखरावरून नृत्य करीत येत आहे. आम्हां रात्रीच्या लेकरांचें अवतारकृत्य आतां संपलें. मृत्यु हाच आतां आमचा मित्र !:आमच्या राखेंतूनच अधिक उच्च, अधिक उत्कट आणि अधिक प्रभावी अशी प्रीति जन्माला येईल. ती सूर्यप्रकाशांत हंसत राहील. तीच खरी अमर प्रीति होईल. ’



# वि. स. खांडेकर यांचें वाङ्मय

## इतर वाङ्मय

गडकरी : व्यक्ति आणि वाङ्मय
( दुसरी आवृत्ति )
सहा भाषणें ,, ,,
वनभोजन ,, ,,
धुंधुर्मास
गोकर्णीचीं फुलें
फुलें आणि कांटे
गोफ आणि गोफण
मराठीचा नाट्यसंसार
तीन सम्मेलनें
तुरुंगांतील पत्रें भा. १ ला.
तुरुंगांतील पत्रें भा. २ रा.
रंकाचें राज्य

## आगामी

अश्रु आणि हास्य ( कथासंग्रह )
हस्ताचा पाऊस ( ,, )
तुरुंगांतलीं पत्रें भाग ३ रा
वाळूंतलीं फुलें ( अनुवाद )
चार व्याख्यानें ( भाषणें )
पार्श्वसंगीत ( लघुनिबंध )
नवी स्त्री ( कादंबरी )
बुद्ध आणि हिटलर ( कादंबरी )
वर्षाकाल ( ,, )
नवे तारे ( टीका )

## बोलपट

छाया
ज्वाला
देवता
सुखाचा शोध
अमृत
संगम
तुझाच
माझें बाळ
बडी मा ( हिंदी )
सुभद्रा ,,
धर्मपत्नी ( तेलगू )
लग्न पहावें करून
सरकारी पाहुणे
} मूळ कथा— चिं. वि. जोशी.

